# बनावट बायको



[ विनोदी नाटक ]

: लेखक :

कॅप्टन मा. कृ. शिंदे

द्वितीयावृत्ति
१९४६



किंमत १ रुपया

प्रकाशकः—
कृष्णाजी नारायण सापळे
रामकृष्ण प्रकाशन मंडळ
ज्युडेक्स बिल्डिंग, त्रिभुवन रोड. मं. ४



ह्या नाटकाचा प्रथम प्रयोग, येथील बॉम्बे थिएटरांत रविवार ता. १ सप्टेंबर १९४० रोजी दि. ४ वाजतां संजीवन संगीत मंडळीनें केला.



मुद्रकः—
कृष्णाजी नारायण सापळे
रामकृष्ण प्रिं. प्रेस,
ज्युडेक्स बिल्डिंग, त्रिभुवन रोड, मुं. ४

# बरं कां—

माझी भूमिका स्पष्ट करण्यासाठींच मी हें लिहीत आहें. ही कांहीं प्रस्तावना नव्हे. स्पष्टच बोलायचें म्हणजे, आजच्या मराठी रंगभूमीवर नाटककाराच्या लेखणीला फारसा वाव नाहीं. नाटक कंपन्यांच्या मालकांची धंदेवाईक लहर, नाटकांत कामें करणाऱ्या नटनटींचें अभिनय—सामर्थ्य व प्रेक्षकांची विशिष्ट अभिरुचि, अशा ह्या तीन बिंदूंच्या संकुचित त्रिकोणांत नाटककाराला आपल्या लेखणीला डांबून ठेवावी लागते. अर्थात् त्याची कुचंबणा होते यांत शंका नाहीं. 'बंडखोर कुमारी', 'गृहलक्ष्मी' व 'गुंतागुंत' इत्यादि नाटकें लिहितांना माझी भूमिका थोडीशी प्रचारकाची होती. त्या नाटकांतून मला कांहीं तरी सांगावयाचें होतें. आणि माझ्या मगदुराप्रमाणे 'अधिकार तैसा करूं उपदेश' या न्यायानें मीं माझी प्रचारकाची भूमिका सांभाळलेली आहे. परंतु 'बनावट बायको' नाटक लिहि-तांना माझी भूमिका बरीच वेगळी आहे. केवळ मनोरंजन करण्यासाठींच मीं हें नाटक लिहिल्यामुळें, माझे टीकाकार 'घटकाभर हंसविणारा एक विदूषक' अशीच माझी संभावना करतील, हें मी पक्कें जाणून आहें. परंतु 'घटकाभर हंसविण्याचें काम' जरी 'बनावट बायको'कडून यशस्वीपणें झालें तरीहि मी स्वतःची पाठ स्वतःच थोपटून घेईन! मग टीकाकार कांहींहि म्हणोत! केवळ करमणुकीखातरच नाटक लिहायचें असें माझ्या मनानें ठरविल्यामुळें, मी एका इंग्रजी नाटकांतील कथानकाच्या मूळ कल्पनेची उसनवारी केली, हें मीं इथें स्पष्टपणें कबूल करीत आहें.

कृत्रिमतेप्रमाणेंच वास्तवता ही देखील कलेची सखीच होय! परंतु नाट्य-कलेच्या बाबतींत तरी कृत्रिमतेनें आपली सखीची मर्यादा सोडून सासूचा आव आणला आणि बिचाऱ्या नाट्यकलेचा छळवाद मांडला! त्यामुळें वास्तवता ही खरी सखी असूनसुद्धां नाट्यकलेला ती सवतीसारखी वाटूं लागली. खंकाळ कृत्रिमतेनें आपल्या नाजुक नखऱ्यानें मराठी रंगभूमीला कबजांत ठेवून, प्रेक्षकांना भारून टाकलें. अर्थात् प्रेक्षकांच्या प्रेमानें मराठी रंगभूमि वैभवाच्या शिखरावर

जाऊन पोंचली, पण त्याच वैभवाच्या धुंदींत बेहोष व बेफिकिर बनली. परंतु ही तिची धुंदी फार वेळ टिकली नाहीं. तिच्या बेपर्वा वागणुकीमुळें रंगभूमीवर एक प्रकारचा ठराविकपणा आला नि नाविन्य नांवालासुद्धां उरलें नाहीं. बद-लत्या अभिरुचीच्या चाणाक्ष प्रेक्षकांना अर्थातच हळूहळू तिचा कंटाळा येऊं लागला.

शिंक्याचें सुटलें नि बोक्याचें साधलें ह्या म्हणीप्रमाणें, रंगभूमीवर नाराज झालेल्या प्रेक्षकांमुळें सिनेमाचें आयतेंच साधलें. परंतु अद्याप कांहीं मराठी रंगभूमीचे डोळे पुरते उघडलेले दिसत नाहींत ! ती पूर्णपणें कृत्रिमतेच्याच फसव्या फंदांत गर्क आहे ! उदाहरण द्यावयाचें झालेंच, तर नाटकांतील संगीताचें देतां येईल. नाटकांत गाणीं पाहिजेत, म्हणून तीं कुठेंतरी कशींतरी घुसडून देण्याची जवळ जवळ प्रथाच पडली आहे ! गाणीं घालतांना स्थळ, काळ, परिस्थितीचा मुळींच विचार केला जात नाहीं. वाईट एवढेंच वाटतें कीं, अनिष्ट रूढींचा विध्वंस व्हावा अशा मताचा मी असूनसुद्धां, मलाहि केवळ नाईलाजानें त्याच अनिष्ट प्रथेला बळी पडावें लागत आहे !

देखाव्यांच्या बाबतींतहि तेंच! रंगभूमीवरील नेपथ्यरचनेंत अनेक सुधारणा होणें इष्ट असतांनासुद्धां, तिकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं. अशा अनेक गोष्टींची हेळसांड झाल्यामुळेंच आजची मराठी रंगभूमि अगदीं डबघाईस आली आहे. तिला तिचें पूर्ववैभव प्राप्त करून देण्यासाठीं, रंगभूमीवर अनेक प्रयोग (Experiments) होणें आवश्यक आहे. असे प्रयोग करणें, वाटतें तितकें सोपें खास नाहीं. कारण त्यासाठीं बरीच झीज सोसावी लागेल; —बराच त्याग करावा लागेल! परंतु आजच्या डळमळत्या धंदेवाईक नाट्यभूमीला त्यागाची कल्पनाच सहन होणें शक्य नाहीं. कांहीं सुशिक्षित नट-नटींनीं मर्यादित त्यागाचा अंदाजी आडाखा बांधून, तसे प्रयोग करण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला खरा; परंतु त्या प्रयत्नांच्या मागें फायद्याचीच दृष्टि असल्यामुळें ते प्रयत्न अयशस्वी ठरले. अर्थात् असे प्रयोग करून नाट्यकलेची

जोपासना करण्यासाठीं एक तर सरकारीच संस्था निर्माण झाल्या पाहिजेत; किंवा सार्वजनिक संस्थांनीं तरी पुढें आलें पाहिजे. रशियन क्रांति घडवून आणणाऱ्या लेखकांनी ज्याप्रमाणें Futurism निर्माण करून रशियन वाङ्मयाला निर्भेळ वास्तववादाचें स्वरूप प्राप्त करून दिलें, त्याप्रमाणें आजच्या मराठी रंगभूमीवर-सुद्धां Futurism निर्माण झालें पाहिजे. तसें झालें, तरच मराठी रंगभूमीला जगण्याची आशा. नाहीं तर—असो. 'बनावट बायको' रंगभूमीवर येत आहे, ती केवळ माझे दीर्घ परिचित मित्र श्री. एस. बी. जोशी (संचालक संजीवन सं. मं.), 'करमणूक' साप्ताहिकाचे संचालक श्री. एन्. आर. जोशी व नव परिचित मित्र नटवर्य श्री. गोविंदराव लेले, (माजी 'नाट्यकला प्रसारक मंडळी'चे मालक) यांच्या प्रेमळ आग्रहामुळेंच होय. त्यांचे मनःपूर्वक आभार मानणें हें मी माझें कर्तव्यच समजतों. त्याचप्रमाणें श्री. धर्मनाथ, श्री. शंकरराव चव्हाण व नाटकांत कामें करणाऱ्या नटनटींनीं 'बनावट बायको' यशस्वी करण्यासाठीं जी आपुलकीच्या भावनेनें मदत केली, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. श्रीकांत सं. विद्यालयाचे चालक श्री. शंकरराव हिंदळेकर यांनीं केवळ स्नेहाखातर पदांसाठीं गोड चाली देऊन तीं व्यवस्थितपणें बसवून घेतलीं, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होत. शेवटीं वरील सर्वांचे, व ज्यांनीं ज्यांनीं 'बनावट बायको' यशस्वी करण्यासाठीं हातभार लावला त्यांचे पुन्हां एकदां आभार मानणारा—

खडेराव चाळ,<br>
खोताची वाडी, मुंबई ४.<br>
ता. ३१ ऑगस्ट १९४०

रसिकांचा नम्र,<br>
भा. अ. घोटे

# दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्तानें—

१९४० सालीं 'बनावट बायको' रंगभूमीवर आल्यानंतर, अनेक वृत्तपत्रांनीं प्रशंसापूर्ण अभिप्राय दिले, याबद्दल प्रथम त्या सर्व वृत्तपत्रांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें हें मी माझें कर्तव्य समजतों. गेल्या सहा वर्षांच्या काळांत अनेक नाट्यसंस्थांतर्फे आणि अनेक शाळा कॉलेजांच्या संमेलन-समारंभ प्रसंगीं, सबंध महाराष्ट्रभर ह्या नाटकाचे शेंकडो प्रयोग झाले. विशेष उल्लेखनीय गोष्ट ही कीं, स्त्रियांनींच स्त्रियांच्या आणि पुरुषांच्याहि भूमिका केलेले ह्या नाटकाचे अनेक प्रयोग झाले, आणि अशा रीतीनें अश्लीलमार्तंडांना परस्पर रोखठोक उत्तर मिळालें. तरीहि ह्या आवृत्तींत कांहीं ठिकाणीं मी किरकोळ सुधारणा केल्या आहेत. ह्याच नाटकाला आणखी एक तासाची प्रयोगदृष्ट्या स्वयंसंपूर्ण पुरवणी म्हणून मी लिहिलेलें '**अर्थाचा अनर्थ**' या नांवाचें 'त्रोटक' यापूर्वीच प्रसिद्ध झालें असून, तें ह्या नाटकास जोडून चार तासांचा जोड कार्यक्रमहि करतां येतो.

युद्धजन्य परिस्थितीमुळें पुस्तक प्रकाशनाचें काम कठीण झालें नसतें तर, ही आवृत्ति यापूर्वीच प्रसिद्ध झाली असती. उशिरानें का होईना, ही द्वितीयावृत्ति निघण्याचें सर्व श्रेय नाट्यरसिकांनाच आहे. म्हणून त्या सर्वांचे, कागदाची टंचाई असतांहि ह्या द्वितीयावृत्तीची जबाबदारी स्वखुशीनें पत्करणारे श्री. बाबूराव सापळे यांचे आणि त्या बाबतींत मला हरएक प्रकारचें साहाय्य करणारे 'यशवंत' मासिकाचे संपादक श्री. पाध्ये यांचे, मी मनःपूर्वक आभार मानतों.

शेल्टर,
खोताची वाडी,
मुंबई नं ४.
ता. १ ऑगस्ट १९४६

नाट्यरसिकांचा नम्र,
**कॅप्टन मा. कृ. शिंदे**

माझ्या लहानपणीं मला वाचनाचें ‘ व्यसन ’ लावणाऱ्या

कै. ती. आत्येच्या पवित्र स्मृतीस

सादर समर्पण

कॅ. शिंदे

# कॅप्टन मा. कृ. शिंदे यांचा
# साहित्य – संसार

**गांधी महात्म्य** — महात्मा गांधींचें ओवीबद्ध चरित्र.

**मोहनमाळ** — कविता संग्रह.

**बंडखोर कुमारी** — नाटक

**गृहलक्ष्मी** — विनोदी नाटिका

**देवपूजा** — १ ला लघुकथा संग्रह

**गुंतागुंत** — नाटक

**बनावट बायको** — साद्यंत विनोदी नाटक ( द्वि. आ. )

**ठिणग्या आणि टिकल्या** — २ रा लघुकथासंग्रह

**अर्थाचा अनर्थ** — त्रोटक

: पटकथा :

**सच्चा सपना** ( हिंदी )

## आगामी

: नाटिका :

**पट्टराणी**

**पुढारी**

**प्राणनाथ**

: लेखसंग्रह :

**फुलपत्री**

: नाटकें :

**पोटासाठीं**

**स्वामी विवेकानंद**

**आगरकर**

**हीच मुलीची आई**

: त्रोटकें :

**चेटूक**

**एका माळेचे मणी**

: कादंबरी :

**नवी वाट**

# बनावट बायको

## प्रथमार्ध



[ अण्णासाहेब गोखले यांचा बंगला. **शिवा** गाणे गुणगुणत व्यवस्थितपणें सजविलेल्या दिवाणखान्यांतील फर्निचर साफसूफ करीत असतांना पडदा उघडतो. शिवा मधूनमधून आरशांत पहातो नि साफसफाई करतो. शेवटी तिथल्याच एका कोचावर ' हुश्य ' करून बसतो.

**शिवा** —( कोचावरून ) साळू—ये साळू !

**साळू** —( ओल्या लुगड्याचा पिळा खांद्यावर टाकून एक शेव झटकीत प्रवेश करते. ) बाय-बाय-बाय ! नांव घेऊन काय हाक मारतांव ?

**शिवा** —( हंसून ) साला म्हनतांव काय ? मी सगल्या रामांचा म्होरक्या हाय,—ठावं हाय तुस ? अग आमी इतं नाय जिवाची मंबय करायची, तर कुटं बानकोटास व्हय ? साला हाय काय नि नाय काय ?

**साळू** —( लुगडं झटकीत ) तसं कुटं म्हनतांय मी ? तुमी माजं असं नांव घेताना कुनी ऐकलं, तर हंसतील ना आपले जातभाय ! जातीसाठीं मातीबी खायास हवी आमी कुरवाड्यांनीं !

**शिवा** — अग व्हय ! ठावं हाय तें पुरान मस ! तुजं नांव नाय घ्यायचं तर कुनाचं ? मी काय बामनाच्या बायकासारं हातांत हात धरून रस्त्यातनं फिराया

जाया सांगतांव? मी तुजा मागारी, तूं माजी मागारीन! साला हाय काय नि नाय काय! आँ! अग साळू, हतं लाज सोडून व्हाया हवं. ठावं हाय तुस? जातीसाठीं माती खावी म्हनून म्हनून आमची कुरवाड्यांची जात आतां मातीस मिळाया आली! हायस कुटं? म्हने जातीसाठीं माती खायास हवी!–मॉप झालीं शास्तरं! आनी काय ग, हंसनार हंसनार ते कोन जातभाय हायत् आमां हंसाया?

**साळू**—तो खायल्या वाडचा गोपालदादा—

**शिवा**—हात् तुजी–! अग तो गोपालदादा हाय सक्यादादाचा मिवना. आनि सक्यादादा हाय त्या इशामामाचा लागीचा पावना. आनि इशामामा? हॅं! तो तर साला माझ्या थोरल्या भावासमान! साला हाय काय नि नाय काय!

**साळू**—बाय–बाय–बाय! म्हनतांव तरी काय तुमी? जाया हवं मला आंतल्या कामाला!

**शिवा**—अग जाशील ग! जरा बस हतं. मी म्हातारपनीं लगीन कशास केलं? ठावं हाय? अग दांडगेपनी बायकोची आटवन्वी येत नाय. मॉप बायका मिळतात! म्हातारपनीं बायको मिळत नाय, म्हनून तर लगीन केलं! अग आतां म्हातारपनीं सुक नाय खायचं तर कवां? तो फोटू बग! (रामपंचायतनाच्या तसबिरीकडे बोट दाखवून) अग देवासारके देवसुदां आपल्या बायकोला जवळ घेऊन बसतात–हायस् कुटं! इटोबाकडे रुक्मिनी आनि इष्णूकडे लक्षिमी रातदिस बसलेली असते बग. चल ये–शेट बी घरांत नायत्! [तिचा हात धरून तिला जबरदस्तीनें आपल्या शेजारीं बसवतो. साळू पदरानें तोंड झांकीत झांकीत कोचावर उकिडवी बसते.] हं! मी शेट नि तूं शेटालीन!–हो बरी आटव झाली! आज धाकटे शेट यायचेत हतं! जरा जपून वागाया हवं हां! बरोबर त्यांचं तें पाकरुंवी यायचं हाय.

**साळू**—पाकरूं?

**शिवा**—अग व्हय पाकरूं! रंगीबेरंगी पाकरूं हाय बग–अगदीं तुज्यासारकं हाय तें.

**साळू**—म्हनजे? धाकट्या शेटचं लगीनसुदां झालंय वाटतं?

**शिवा**—तेवडंच फकत व्हायचं ऱ्हायलंय. बाकी सगळं झालंय.—आतां होनार हाय त्यांचं लगीन! साला हाय काय नि नाय काय! लग्नाआदींच—

[ दाराची घंटा वाजते. शिवा दचकतो. ताबडतोब साळूला आंत ढकलतो. त्याची तारांबळ उडते. थोडंसं साफसूफ केल्यासारखं करून दार उघडतो. सुरेश, सुधा, सरल आणि डोकीवर बॅग-बिछाना घेतलेला एक हमाल प्रवेश करतात. शिवा सुरेशला नमस्कार करतो.

**सुरेश** — ( हमालाला पैसे देतां देतां ) काय शिवा, ठीक आहे ना ?

[ हमाल पैसे घेऊन जातो.

**शिवा** — (दोन्ही हात चोळीत चोळीत ) व्हय शेट ! मला वाटलं थोरले शेट आले म्हनून !–हॅ –हॅ –हॅ —

**सुरेश** — ( घाम पुसतां पुसतां सुधा व सरलला ) हा आमचा रामा गडी. ( शिवा त्यांना नमस्कार करतो. ) फार जुना गडी आहे हा आमचा ! ( बसतां बसतां ) बसा. उभ्या कां अशा ? ( त्या बसतात. ) काय रे शिवा—

**शिवा** — व्हय शेट !

**सुरेश** — अण्णा कुठं गेले ? आज लौकरच हॉस्पिटलांत गेले वाटतं ?

**सुधा** — हॉस्पिटलांत ? हॉस्पिटलात कशाला ? आजारी आहेत वाटतं ?

[ सरल हंसते.

**सुरेश** — ( हंसत ) छे छे ! अग सांगितलं नाहीं का तुला ? ते त्या पलिकडच्या वेड्याच्या हॉस्पिटलचे इन्‌चार्ज आहेत. सारी व्यवस्था त्यानाच पहावी लागते.

**सरल** — आणि सुधा, अण्णांनासुद्धां त्यांतच एक प्रकारची मौज वाटते. आख्खा दिवस आपले ते वेड्यांचे वेडे चाळे पहात असतात. कंटाळा कसा येत नाहीं बाई कोण जाणे !

**शिवा** — आनि शेट, आज एक नवा येडा आलाय सकाळींच.

**सुरेश** — तरच ! तरी म्हटलं इतक्या लौकर ते कसे गेले ? कारे शिवा, तूं ओळखतोस कीं नाहीं ( सरलकडे बोट दाखवून ) हिला ?

**शिवा** — ( अदबीनें ) वाः ! शेट ओलक कसा इसरेन ! आमच्या शेटालीन व्हनार हायत् नाय का त्या आतां ? आबासायबांचें थोरलें चेड्डूं ! साला हाय काय नि नाय काय ?

**सुरेश** — वाः ! शिवा, तुला बरीच माहिती दिसते ! हिचं नि माझं लग्न होणार आहे, हेंसुद्धां अण्णांनीं तुला सांगितलं वाटतं ? ( शिवा होकारार्थी मान

हालवतो. ) पाहिलंस सरळ, अण्णांनीं ही बातमी आपल्या नोकराचाकरांना देखील सांगितलेली दिसते.

**सरल**—शिवाय गेल्या वर्षी नव्हतें का मी आमच्या आबांबरोबर इकडे आलें? तेव्हांच शिवानें प्रथम मला पाहिलं असेल.

**शिवा**—( सुरेशला ) व्हय-व्हय शेट !

**सुरेश**—शिवा, तुला आनंदाची बातमी सांगतों. माझं हिच्याशीं लग्न होणार आहे. ठरवूनच आलोंत आम्हीं.

**शिवा**—( आनंदानें ) ऑं ! म्हनतांव काय? शेट, तुमचं आतां लगीन व्हनार ! साला हाय काय नि नाय काय? सरलबाईसायब्, शेट म्हणजे नुसतं रतान हाय-रतान ! नशीब इवं असा मागारी मिलाया. शेट चार वरसाचे होते, तवांपासून अंगाखांद्यावरनं खेलवलंय मीं! आतां मोटे दिसतात शेट-पन मला नाय हो मोटे-मला ते न्हानच! ( लाजून ) शेट, माजंबी यंदा-यंदा—

**सुरेश**—शिवा, काय झालं तुझं यंदां ?

**शिवा**—( मान खालीं घालून, एका पायाच्या आंगठ्यानें जमिनीवर अर्धवर्तुळाकृति रेघोट्या ओढल्यासारखें करीत ) यंदा-यदा-वाजवलं !

**सुरेश**—वाजवलं ?-कोणी ?

**शिवा**—थोरल्या शेटनीं !

**सुधा**—म्हणजे ?—याचं लग्नबिग्न करून दिलं वाटतं अण्णांनीं ?

**सुरेश**—( हंसत ) अग तीच तर आनंदाची बातमी सांगतोय तो ! ( शिवाला ) पण कारे शिवा, बायको कुठं आहे? बाणकोटला होय ?

**शिवा**—नाय नाय, इतंच हाय ! थोरले शेट मला म्हनाले, आमचा सुरेश लगीन करील तवां करील, आदीं तूं तरी टाक लगीन करून ! शेट, असं बगा, मलाबी अंतीच्या वक्ताला पानी द्याया कोनतरी मानूस हवच होतं. तंवा मींबी मनावर घेतलं, नि काडली एक मागारीन हुडकून ! थोरल्या शेटनी तिला ठेवलीय आंतल्या कामाला नि मला ठेवलाय भायरल्या कामाला ! ( हांक मारून ) मागारनी, ओ मागारनी ! ( ओ येत नाहींसें पाहून जरा मोठ्यानें ) म्हनतांय काय मी ? आलीस काय ?

**साळू**—( आंतून ) आलांव-आलांव !

[राखेनें लडबडलेलें एक अर्धवट घांसलेलें भांडें घेऊन प्रवेश करते, व मान खालीं घालून उभी राहाते.

**सुरेश**—ही तुझी मागारीण काय? सुधा, सरल, पाहिलीत आमच्या शिवाची मागारीण? (सुधा सरल हंसतात. शिवा लाजून मान खालीं घालतो.) चांगली आहे नाहीं? (सुधा व सरल मानेनेंच संमति देतात.)

**शिवा**—(साळूला दम देऊन) साला हाय काय नि नाय काय? म्हनतांय काय मी? पायां पड ना सगल्यांच्या!

[साळू अगदीं वाकून सर्वांना नमस्कार करते. सुधा, सरल मिस्किलपणें हंसत 'अष्टपुत्रा सौभाग्यवति भव' असा आशिर्वाद देतात. साळू शेवटीं शिवालाहि नमस्कार करून आंत पळत सुटते.

**सुरेश**—यांनीं काय आशिर्वाद दिला तुझ्या बायकोला कळला तुला? (शिवा 'नाहीं' अशी मान हालवतो.) तुला आठ मुलगे होवोत, असं म्हटलं यांनीं!

**शिवा**—(लाजून) आट! आतां हाय कुनाला ताकद आट पोरं पोसाया! एकादा झाला, तरी तुमच्या पायाची किरपा!

**सुरेश**—बरं शिवा, तूं लौकर जा—आणि—

**शिवा**—जातांव शेट! (निघून जाऊं लागतो.)

**सुरेश**—हें पहा शिवा, (शिवा परततो.) कुठं जाशी?

**शिवा**—कुटं जाव? तुमी म्हनाल तिथं जातांव!

**सुरेश**—वेड्यांच्या हॉस्पिटलांत जा.

**शिवा**—चाललांव शेट! (पळत जाऊं लागतो.)

**सुरेश**—अरे हें बघ, (शिवा परततो) आम्ही आलों आहोंत म्हणून सांग अण्णांना!

**शिवा**—बरं हाय शेट! (जाऊं लागतो.)

**सुरेश**—अरे शिवा, असा पळतोस कुठं? (शिवा परततो.) मी आणि सरल—आम्हीं दोघंच आलोंत म्हणून सांग हं. जा—पळ. लौकर आण बोलावून.

[शिवा जातो. सुरेश उठून शिवा गेल्याची खात्री करून घेतो आणि मग बसून बोलूं लागतो

**सुरेश**—बोल, सरल, काय करायचं आतां ?

**सरल**—मला काय विचारतोस ? काय वाटेल तें कर. ' स्वयें विस्तरीलें जें तें स्वयें निस्तरावें '! आमच्या कानावर हात! तुझा तूं जबाबदार!

**सुधा**—( सुरेशला ) तुम्ही कांहींहि म्हणा, मला बाई नाहीं आवडत हें! माझ्याशीं तुम्ही लग्न करणार, आणि सरल कशी तुमची बायको होईल ?

**सुरेश**—कशी म्हणजे ? अग बनावट बायको व्हायला काय हरकत आहे ? खरी बायको व्हायला मी थोडाच आग्रह करतोंय तिला ?

**सरल**—तूं खूप आग्रह करशील ! पण मी थोडीच बसलेंय तुझी बायको व्हायला !

**सुरेश**—( वैतागून ) अग पण आतां करायचं काय, तें तरी सांग ! तुझं माझं लग्न ठरलं आहे, असं सांगितल्याशिवाय अण्णा कांहीं एक कवडीसुद्धां मला ठेवणार नाहींत ! वेड्यांच्या हॉस्पिटललाच सर्व इस्टेट देऊन टाकीन म्हणतात ते ! बरं पूर्वी आपण सगळं ठरवल, इथं आलों, आणि आता आयत्या वेळीं असा अवसानघात करतेस ? सरल, असं नको ग करूं ! तुझ्या पायां पडतों— हो ना ग माझी बायको !

**सुधा**—( फणकाऱ्यानें ) इश्य ! भलतंसलतं काय हो सांगतां तिला ? मी तुमची बायको असतांना ती कशी होईल तुमची बायको ?

**सुरेश**—( चिडून ) त्यांत काय झालं न व्हायला ? तूं उगी रहा. तुझ्याशीं माझं लग्न झालं पाहिजे, म्हणून तर अशी युक्ति करतोंय मी !

**सरल**—होय तर !—तुम्ही आपल्या युक्त्या करून आपापला फायदा करून घ्याल ! पण तुमच्या फायद्यांत माझं जन्माचं नुकसान होईल, त्याची काय वाट ?

**सुरेश**—कसलं नुकसान ? तुझं तसं कसलंच नुकसान न होण्याची जबाबदारी मी घेतों. मग तर झालं ? तुला हातसुद्धां लावणार नाहीं. मग तुझ्या जन्माचं नुकसान कसं होईल ?

**सरल**—कसं म्हणजे ? आधींच अशोक माझ्यावर रागावलेत. तशांत मी जर तुमची बायको झालें असं त्यांच्या कानावर जाईल, तर करतील का ते प्रेम माझ्यावर ? करतील का ते माझ्याशीं लग्न ?

**सुधा**—तेच कशाला ?—कुठलाहि पुरुष करायचा नाहीं.

**सुरेश** — तें सांगू नकोस तूं ! प्रेम एकावर करून लग्न दुसऱ्याशींच झाल्याचीं हजार उदाहरणं दाखवीन मी ! प्रेमभंग झालेल्या माजी नवऱ्यांनीं आपल्या प्रेमळ प्रेयसीवर, कोर्टांत दावा केल्याच्या बातम्या नाहीं का तूं वाचल्यास ?

**सरल** — पाहिजे कशाला वितंडवाद ? सुरेश, तूं कांहींहि म्हण, मला नाहीं तुझं कारस्थान आवडत. बरं तर बर—एखादे वेळीं भलतंच व्हायचं ! तुमचं काय ? तुम्हीं आपलीं होणारच आहांत नवरा बायको ! उगीच माझी परक्याची फजिती करण्यांत काय अर्थ ? बनावट का होईना, पण मी तुझी बायको बनणं म्हणजे, अगदीं विस्तवाशीं खेळ आहे.

**सुरेश** — अग खरं ग तें. पण असा विस्तवाशीं खेळ केला नाहीं, तर शेवटीं तुला नि मला एकाच होमकुंडात होरपळून निघाव लागेल, याची तुला कल्पना तरी आहे का ? बर—अगोदर सगळं कबूल करून, आतां कसं असं म्हणतेस ?

**सरल** — एखाद्या गोष्टीचा नुसता विचार करणं, नि ती प्रत्यक्ष करणं यांत फार अंतर असत सुरेश. मीं होकार दिला, त्या वेळीं मी कल्पना करीत होतें. पण आतां प्रत्यक्ष प्रसंग आल्याबरोबर भावी परिणामांचं सारं भेसूर चित्र माझ्या दृष्टीसमोर नाचू लागलं. माझं मन धजत नाहीं आतां.

**सुरेश** — ( हातपाय गाळून ) मग काय !—आटोपलंच म्हणायचं सगळं. काय सुधा !

**सुधा** — मी काय बाई सांगू ?—मी नको म्हणतें ती एवढ्याचसाटीं.—सरल आज बनावट बायको म्हणून तुमच्याशीं वागू लागली, आणि शेवटीं खरीच बायको होऊन बसली तर !

**सरल** — ( रागानें ) माझं अडलंय खेटर ह्याची बायको व्हायला ! तुझा नवरा तूंच घेऊन बस. फुकट दिलास तरी नको कुणाला तो ! आपल्यावरून जग पारखूं नये माणसान.

**सुधा** — म्हणजे कसं ?

**सरल** — कसं म्हणजे ? माझ्यामुळं तुझी नि ह्याची ओळख झाली. आणि भाऊबहिणीप्रमाणं वागतां वागतां, शेवटीं वल्लभ—रमणी बनलां कीं नाहीं ? तसं नाहीं बरं बाईसाहेब आम्ही करणार !

**सुधा** — तर मग नाहीं माझी हरकत !

**सरल**—तुझ्या हरकतीचा प्रश्नच आहे कुठं ? माझीच नाहीं तयारी.

**सुरेश**—( कंटाळून ) अग, अशा उगीच कशाला सवतीसारख्या भांडतां ? सरल, तुला खरं सांगूं का ?

**सरल**—मग आतांपर्यंतचं सगळं खोटं होतं वाटतं ?

**सुरेश**—तसं नव्हे ग. तुला अशोकशींच लग्न करायचं आहे ना !

**सरल**—होय. मी अशोकशींच लग्न करणार !

**सुरेश**—मग मला एकदां सुधेशीं लग्न करून टाकूं दे, कीं तुझा मार्ग तरी मोकळा होईल. हें पहा सरल, आतां जास्त आढेवेढे घेऊ नकोस. अग बोलून चालून नाटक करायचं; अण्णांना फसवायचं नि पैसा पदरांत पाडून घ्यायचा ! आहे काय त्यांत ? आटप. होय म्हण एकदां. करायच ना नाटक ? ( चुटक्या वाजवीत ) आटप–आटप–आटप–( दाराची घंटा वाजते )

**सुरेश**—( घाबरून ) आटपलंच सगळं ! अण्णा आले. पुरी फजिती होणार आतां. ( गोंधळल्यासारखा करून दरवाजा उघडायला जातो. )

**सुधा**—सरल, म्हण ना ग होय. तूं त्यांची बनावट बायको झालीस, तरच मला त्यांची खरी बायको होण्याची आशा. निदान माझ्यासाठीं तरी ऐक त्यांचं तेवढं.

**सरल**—( जळफळत ) बरं बाई ऐकतें. माझ्याच जन्माचं नाटक झालं नाहीं म्हणजे झालं !

[ सुरेश हातांत एक पत्र घेऊन येतो.

**सुरेश**—मला वाटलं अण्णाच आले म्हणून ! ( पत्राकडे पाहून ) फ्रॉम... ...ओहो ! आपलं नाटक रंगणार, सरल. आज सोन्याचाच दिवस उगवला म्हणायचा !

पद

**मंगल हा गमला ॥**
**सुदिन आज लाभला ॥ ध्रु० ॥**

**शुभशकून हा खराच ॥**
**सोनेरी संधि खरी ॥**
**ही शुभ वेळा ॥ १ ॥**

धीर मिळे अधिर जिवा ॥
डाव सुचे एक नवा ॥
भाग्यकाल हा आला ॥ २ ॥

**सुधा**—कुणाचं पत्र तें ? कसं रंगणार नाटक ?

**सुरेश**—थांब सांगतों. ( पत्र फोडून वाचून ) सरल, सरल, ( सरल पहात नाहीं ) ठीक आहे. नको पाहूं. कशी इकडे पहात नाहींस तें पहातों. सुधा, ( तिला जवळ बोलावून ) हें पहा कुणाचं पत्र आलंय तें. ही पहा सही—

**सुधा**—( सही पाहून ) अय्या ! प्रो. अशोक !

[ सरल चटकन् त्यांच्याकडे पहाते. सुरेश मोठ्यानें हंसूं लागतो.

**सरल**—( घाबरून ) अशोक ! म्हणजे अशोकचं तें पत्र ? त्यांना कुणी सांगितलं मी इकडे आलें तें ? सुरेश—सुरेश, काय रे हें केलंस ? ( रडकुंडीस येऊन ) आधींच ते माझ्यावर नाराज झालेले. तुझ्याबरोबर इकडे आल्याचं कळतांच, आतां नाहीं नाही ते घाणेरडे आरोप करतील माझ्यावर ! काय रे केलस हें सुरेश ! ( हातांनीं तोंड झांकून रडूं लागते. )

**सुरेश**—( हंसून ) अग अग सरल, ऐकून तरी घे आधीं. उगीच लागली रडायला. अग मीं नाहीं त्यांना कळवलं, त्यांनींच आपण इकडे येणार असल्याचं आमच्या अण्णांना कळवलं आहे.

**सरल**—( डोळे पुसून ) पाहूं दे तें पत्र. ( पत्र घेऊन वाचते. ) अगबाई ! म्हणजे तुमच्या अण्णांचा नि अशोकचा बराच पत्रव्यवहार झालेला दिसतो. ( पत्र वाचूं लागते. ) "...वेड्यांचें हॉस्पिटल पहाण्याची परवानगी आपण दिलींत, याबद्दल मी आपला आभारी आहें. तारीख एक एप्रिल रोजीं सकाळीं मी वेड्यांच्या हॉस्पिटलांत येईन. कळावें. लोभ असावा, ही विनंति. आपला प्रो. 'अशोक'"

**सुधा**—एक एप्रिल रोजीं ?—म्हणजे आजच !

**सरल**—( कॅलेंडरकडे पाहून ) हो—आजच !

**सुरेश**—( हंसत हंसत ) वेड्यांचं हॉस्पिटल पहायला दिवस मात्र छान काढला. योग्य वेळीं येणार ते इकडे.

**सरल** — मग सुरेश, आतां काय करायचं ? तुझे अण्णा चुकून जरी बोलले त्यांना मी इकडे आल्याचं, तर मोठा घोटाळा होईल. काय करायचं आता सुरेश ?

**सुरेश** — काय करायचं तें मी कधींच ठरवून ठेवलं आहे.

**सुधा** — काय करायचं ?

**सुरेश** — अशोक आले, कीं त्यांना एप्रिल-फूल ठरवायचं !

**सरल** — इश्श ! भलती नको थट्टा सुरेश. कांहीं तरी मार्ग काढलाच पाहिजे

**सुरेश** — मीं काढलेला मार्ग, हाच एक राजमार्ग आहे.

**सरल** — कुठला तो ?

**सुरेश** — तें तुला कशाला ? तू होतेस का माझी बायको ?

**सुधा** — ( मधेंच घाईघाईनें ) बनावट बायको !

**सुरेश** — हो-बनावट बायको. होतेस का ?

**सरल** — समज झालें. तर ?

**सुरेश** — तर काय ? तुला तुझा खरा नवरा मिळवून देतो आपण.

**सरल** — तो कसा काय ?

**सुरेश** — त्याची पंचाईत तुला नको. मी सांगेन तसं प्रत्येकानं वागायचं. म्हणजे पहा, तुझा तो अशोक पायां पडत नि नाक घांशीत तुझ्यावर कसा प्रेम करूं लागेल तो ! आहेच तशी अजब युक्ति ! बोल, आहे कबूल ?

**सरल** — ( विचार केल्यासारखें करून ) कबूल !

**सुरेश** — आणि सुधा तुला ?

**सुधा** — तुमचं माझं लग्न होत असेल, तर काय वाटेल तें कबूल आहे मला.

**सुरेश** — ठीक आहे. पुन्हां असा आयत्या वेळीं घोटाळा करायचा नाहीं हं. आतां सांगा बरं आपापल्या भूमिका. ( सरलला ) तूं माझी—

**सरल** — बायको.

**सुरेश** — ( सुधेला ) आणि तूं ?

**सुधा** — तुमची बायको !

**सुरेश** — झाला-परत घोटाळा झाला. अग, तूं हिची मैत्रिण !

**सुधा** — हो-हो-! मी सरलची मैत्रिण, नि ती तुमची बायको. पण सांगून ठेवतें, हिच्याशीं जास्त नाहीं हं सलगी करायची ! मला नाहीं बाई सहन व्हायचं तें. सरल, तूसुद्धां बेतानंच बोलायचं बरं का यांच्याशी.

**सुरेश** — ठीक. आपापल्या भूमिका विसरूं नका बरं. सरल, तुझे ते प्रो. अशोक आले कीं मी तुला खूण करीन. खूण केली कीं तूं एखादं गोडसं गाणं गाऊं लाग.

**सरल** — खूण कसली करशील?

**सुरेश** — आमचे अण्णा नेहमीं एक पालुपद म्हणतात, तें ठाऊक आहे ना तुला ?

**सरल** — ( हंसून ) होय — 'ज्याचं नाव तें' !

**सुरेश** — बस्स. मी मोठ्यानें म्हणेन — 'ज्याचं नांव तें' कीं तू गायला सुरवात करायची. आणि 'सांभाळा-सांभाळा' असं मोठ्यानं म्हटलं कीं, तूं बाहेर यायचं. पण कशी येशील बाहेर ?

**सरल** — कशी येऊ ?

**सुरेश** — वेडी बनून आलं पाहिजे. म्हणजे तूं वेडीच आहेस, अशी समजूत झाली पाहिजे त्यांची.

**सरल** — इश्श ! वेडी ? चांगली आहे, तरीसुद्धां ते माझ्यावर प्रेम करायला तयार नाहींत. मग वेडी आहे असं कळलं, तर मग लग्नाचं नांवच नको. छे — मी नाहीं बुवा वेडी बनणार.

**सुरेश** — अग पण पुढचं कुठं ऐकलंस तूं ?

**सुधा** — सांगून टाका काय तें लौकर. तुमचे अण्णा आले तर !

**सुरेश** — हो खरंच, अण्णा आले तर ?-सरल, तूं बाहेर आलीस गाणं म्हणत म्हणत कीं, गाणं संपल्यावर वेड्यासारखे चाळे करायचे-मिळेल त्याला मिठी मारीत सुटायचं, आणि 'अशोक अशोक' असा शोक करायचा. आणि त्यांनीं कांहीं विचारलच तर—

**सरल** — त्याची नको तुला काळजी. अगदीं बेमालूम वठवतें मी वेडीची भूमिका.

**सुधा** — आहेसच तशी शहाणी तूं !

**सुरेश**—तूं अणाखी नको शहाणपणा दाखवूं आतां. सांग बरं, तुझी कुठली भूमिका ती.

**सुधा**—बाय–बाय–नाहीं—हिची मैत्रिण.

**सरल**—सुधा, आतां तुझी भूमिका मात्र तूं सांभाळ बरं. नाहीं तर सारंच ओमूफस् व्हायचं.

**सुरेश**—झालं एकदांचं! आतां या म्हणावं तुम्ही अण्णा—

[ दराची घंटा वाजते.

**सुधा**—आलेच वाटतं अण्णा!

**सरल**—शंभर वर्षं आयुष्य आहे तुमच्या अण्णांना.

**सुरेश**—( दरवाजा उघडायला जातां जातां ) पाहिजे कशाला आणखी आयुष्य! लौकर हं...करतील तर बरं म्हणतोंय मी.

[ सुरेश दरवाजा उघडतो. अण्णासाहेब व शिवा प्रवेश करतात. अण्णा दिसतांच सरल व सुधा उठून नमस्कार करतात. अण्णा त्यांना नमस्कार करून 'बसा बसा' म्हणतात. सरल बसते. सुधा सुनेच्या नात्यानें लाजून उभीच रहाते. शिवा आंत जातो.

**अण्णा**—( सुधाला ) अशी बाजूला काय उभी राहिलीस? बस–बस!

**सुरेश**—( अण्णांच्या नकळत तिला खुणवून ) बसा–बसा! तुम्हीं कांहीं परक्या नाहींत इथं. हिची मैत्रिण म्हणजे आमच्याच आहांत तुम्ही. ( सुधा बसते. ) अण्णा, यांचं नांव सुधा. ह्या हिच्याबरोबर आल्या आहेत आपल्याकडे. त्यांना वेड्यांचं हॉस्पिटल पहायचं आहे म्हणे.

**अण्णा**—अस्सं–अस्सं! ठीक आहे. आलीच आहे आतां आपल्याकडे, पाहील कधीं तरी. हं–काय सरल! कसं काय चाललं आहे आबासाहेबांचं! प्रकृति-विकृति ठीक आहे ना त्यांची?

**सरल**—हो– ठीक आहे. नमस्कार सांगितला आहे त्यांनीं तुम्हाला.

**अण्णा**—( सामान पाहून ) अरे शिवा–ये शिव्या!

**शिवा**—( लगबगीनें प्रवेश करून ) व्हय शेट!

**अण्णा**—( सामानाकडे बोट दाखवून ) हें काय! दिसत नाहीं? ठेव आधीं तें घरांत नेऊन नीट. तूं म्हणजे असा आहेस अगदीं–ज्याचं नांव तें!

( शिवा सामान नेऊन ठेवूं लागतो. ) आणि हें पहा, साळूला म्हणावं पाणी काढ आंघोळीला. हां–सरल, काय ठरला तुमचा बेत !

**सरल** — ( लाजत ) मी काय सांगूं ? आपल्या इच्छेच्या बाहेर का आहें मी ?

**अण्णा** — हें पहा, ह्यानं जर तुझ्याबरोबर लग्न न करतां दुसऱ्या कोणाबरोबर लग्न केलं, तर ह्याला नि ह्याच्या त्या दुसऱ्या सटवेला–दोघांनाही घरांतून हांकलून लावून, सारी इस्टेट त्या वेड्याच्या हॉस्पिटल-फंडाला देऊन टाकायचा माझा इरादा आहे. पण ह्या गाढवाचे कांहीं अद्याप डोळे उघडत नाहींत. हा म्हणजे असा आहे कीं बस्स–अगदीं ज्याचं नांव तें !

**सुरेश** — उगीच काय अण्णा ? पूर्वी नव्हती माझी इच्छा हिच्याशीं लग्न करायची. पण आतां––

**अण्णा** — आतां काय ? मन बसलंच वाटतं अगदीं हिच्यावर ! होय ? कसं रे पोरांनो तुमचं असलं चंचल प्रेम ? एकदां बसत नाहीं काय, नि एकदां बसतं काय ! तुमचीं हल्लींच्या पोरांचीं प्रेमंच अशीं तकलादू कीं अगदीं ज्याचं नांव तें ! आमचीं जुन्या माणसांचीं प्रेमं म्हणजे काय महाराज ! शिशासारखीं जड होतीं नुसतीं. एकदां कां आमचं प्रेम बसलं कीं मग बसलंच तें ! मग कांहीं करा–उठायचं म्हणून नाहीं. नाहीं तर तुम्ही ! तुमचं प्रेम बसायलाहि कांहीं कारण लागत नाहीं, आणि उठायलाहि कांहीं कारण लागत नाहीं ! असल्या उठाबश्या काढणाऱ्या प्रेमाचा मला असा कांहीं कंटाळा आलाय म्हणून सांगूं–अगदीं ज्यांचं नांव तें ! बरं–पण झालं ना आतां ? बसलं ना हिच्यावर आतां तरी प्रेम ? कीं उठेल आयत्या वेळीं ?

**सुरेश** — नाहीं–नाही. माझं आहेच हिच्यावर प्रेम !

[ सुधा रागीट नजरेनें सुरेशकडे पहाते. सुरेश तिला डोळे मिचकावतो.

**अण्णा** — ठीक आहे. सरल, आतां आबासाहेबांचा विचार घेऊं, मग सावकाश चांगलं डबाज्यानं लग्न करूं. काय ?

**सुरेश** — डबाज्यानं ? छे–छे ! अण्णा, उगीच कशाला खर्च ? आपण आपलं वैदिक पद्धतीनं आटपून घेऊं झालं. काय ग सरल ?

**सरल** — अण्णांच्या इच्छेविरुद्ध मी नाहीं जायची.

**अण्णा** — ऐक – ऐक गाढवाच्या लेका ! पहा कशी वडिलधाऱ्या माणसांना मान देते ती ! उगीच नाही मीं सून पसंत केली ती ! शीक – आतां हिच्याकडून तरी अक्कल शीक. तूं म्हणजे असा आहेस–बस्स–अगदीं ज्याचं नांव तें ! अरे, त्या वैदिक नि रजिस्टरी पद्धति नकोत आम्हाला. आम्हीं आपलीं जुनीं बाळबोधवळणीं माणसं. आपलीं लग्नंहि जुन्याच पद्धतीनं झालीं पाहिजेत. अरे लग्नं झालीं, तीं आमच्या पिढींतल्या लोकांचीं ! आतां ते लोकहि नाहींत, नि तीं लग्नंहि नाहींत ! अरे लग्न म्हटलं कीं तें बाशिंग हवं,–बँड हवं, – तें हें हवं,–तें तें हवं, सारा कांहीं थाट पाहिजे नुसता ! नाहीं तर हल्लींच्या पोरांचीं लग्नं ! नाटकाहून आला नवरा, सिनेमाहून आली नवरी, धरला हातांत हात कीं झालं लग्नं ! ही काय लग्नं ? बरं का सुधा, माझ्या लग्नाच्या वेळीं कांहींच नाहीं, तरी पांच हजार रुपयांचा चुना झाला असेल !

**सुधा** — अय्या ! पांच हजार रुपयांचा चुना ? मग त्या मानानं पान, सुपारी, कात, वेलदोडे, वगैरे वगैरेंना लाख रुपये तरी खर्च आला असेल नाहीं ? ( सर्व हंसतात )

**अण्णा** — अग चुना म्हणजे काय ?– खर्च ! तूंसुद्धां अशी आहेस कीं अगदी ज्याचं नांव तें !

**सुरेश** — ( लटकें हंसें आणून ) हॅ – हॅ – हॅ – खरोखरच अण्णा, फार विनोदी आहेत ह्या. एखाद्याला वाटायचं कीं ह्या वेड्याच आहेत !

[ सुधा रागानें बघते. तो डोळे मिचकावतो.

**सरल** — आणि असलीच वेडी, तर आहेतच आतां अण्णासाहेब समोर. हो– जवळच आहे वेड्यांचं हॉस्पिटल.

**सुरेश** — हां – सरल, सुधा तुझी मैत्रिण असली, तरी माझी पाहुणी आहे. उगीच नको तिला कांहीं बोलूं.

**अण्णा** — ( हंसून ) आणि काय रे सुरेश, तुझी पाहुणी म्हणजे सरलचीहि पाहुणी नव्हे वाटतं ?

**सुरेश** — ( जीभ चावून ) अरे हो ! अण्णा, तें मी विसरलोंच होतों. सरलचं नि माझं नांत – तसं अंगवळणीं पडलं नाहीं अजून.

**अण्णा** — पडेल – पडेल अंगवळणीं ! हो – काय बरं मी म्हणत होतों–हं. (सरलला) तुझ्याशींच सुरेशचं लग्न व्हावं अशी जी माझी इच्छा आहे, त्याच्या मुळाशीं माझा

एक फार निराळा उद्देश आहे. माझ्या संपत्तीचा उपभोग माझ्या मित्राच्याहि मुलीला अनायासें मिळवा, हीच माझी इच्छा. अग तूं मला परका समजतेस, पण तुझ्या आबासाहेबांना मी अगदीं सख्ख्या भावासारखा वाटतो बरं! त्यांच्या माझ्या निकट स्नेहाचं, तुझ्या नि सुरेशच्या लग्नानं कायमचं कलम होऊन त्या कलमाला गोड फळं आलीं, कीं त्यांतच आबासाहेबांना नि मला समाधान! असो. उशिरानं का होईना, पण तुमचं एकमेकाशीं लग्न होणार हें ऐकून समाधान झालं मला. लग्नाचे योगायोग हे असे असतात कीं ज्याचं नांव तें!

**शिवा** — ( प्रवेश करून ) आंगुलीला पानी काडलंय शेट.

**अण्णा** — असं? ठीक. चल आलों. ( सुरेशला ) काय रे ये ठोंब्या. तूं असा नवख्यासारखा काय तिथं उभा? घरांत घेऊन जाशील कीं नाहीं सरलला? छे — तसं नाहीं जमायचं. चल सरल, तूंच जा आतां त्याला घेऊन आंत. आतां असा परकेपणा उपयोगाचा नाहीं. ( दोघांनाही आंत ढकलून देतात. सुधा घाबरते. ) सुधा, तूं अशी घाबरूं नकोस. आपलंच घर आहे हें असं समज. तूं मला मुलीसारखी आहेस बरं! जा — तूं ह्या खोलींत जा. पेटीबिटी वाजवायला येत असेल तर जा वाजवीत बस जा. आमच्या सुरेशची आहे ती पेटी. तो छान वाजवतो. हं — नाहींतर जा त्या खोलींत कांहींतरी वाचीत बस. अरे शिवा, ( शिवा येतो. ) अरे हिला आजचे पेपर आलेत ते दे. आणि लक्ष ठेव. काय हवं नको पहा. समजलं? ( सुधाला ) आलोंच मी मिनिटांत. ( आंत निघून जातात. )

**शिवा** — बाई, जा तुम्ही आंत. हा मी आलांव.

[ तो जातो. सुधा कंटाळल्यासारखी करते. सुरेश आणि सरल असलेल्या खोलीची कडी वाजवते.

**सुधा** — ( कंटाळून ) आतां मी करूं तरी काय?

पद

**बावरा हा जीव झाला ॥**
**नुरला धीर आतां ॥ ध्रु० ॥**
**लागली मना हुरहुर ही ॥**
**घाबरी खरी मी होई ॥ १ ॥**

[ शिवा डाव्या पायांतला फाटका जोडा घेऊन येतो

**शिवा** — काय बाय, अजून तुमी इतंच !

**सुधा** — हा जोडा कशाला घेऊन आलांत

**शिवा** — हूँ—तेंच तर रामबान औशीद हाय. हटकून गून ! साला हाय काय नि नाय काय !

**सुधा** — म्हणजे ? कसलं रामबाण औषध ? वेड्यांच्या हॉस्पिटलांतले वेडे पाहून पाहून तुम्हांहि डोकं फिरलं की काय ?

**शिवा** — डोकं फिरलं ? कुनाचं ? येड्यासारखं काय बोलतांव ? [ हंसून साला हाय काय नि नाय काय ?

**सुधा** — वेडा नाहीं तर काय ! अरे हें औषध कसलं नि कुणाला ?

**शिवा** — कुणाला म्हंजे ! तुमाला !

**सुधाः** — ( रागानें ) मला ? अरे वाः ! तोंड फोडून टाकीन. कोण समजलास तूं मला ? मालकीण आहें मी तुझी !

**सुरेश** — ( लगबगीनें बाहेर येतो. ) शूः- ! अग हळू - हळू जरा ! काय झालं

**सुधा** —( संतापानें ) काय मांडलंत तुम्हीं हें ? असा अपमान ? छान— छान शोभा केलींत बरं माझी. इथं तुमच्या घरांत आणून मला अशी जोड्यांनीं मारायची होती, तर तुमचे हात कुठं गेले होते ? यःकश्चित् नोकरा कडून मला जोड्यानं मारवतां ? चांगलं बरं - चांगलं केलंत ! ( रडूं लागते. )

**सुरेश** — ( आश्चर्यानें ) अरेच्या ! पण झालं तरी काय ? शिवा, काय झाल रे ! कशाला आणलास तो जोडा ?

**शिवा** — शेट, हा डाव्या पायांतला फाटका जोडा हाय. तो नाकाशीं धरला, कीं फेपरं उतरलंच म्हनून समजा.

**सुधा** — फेपरं ? कुणाला आलंय फेपरं ? ( सुरेशला ) ऐका - ऐका तुमच्या नोकराचे शब्द ! मी मात्र मूर्ख ठरलें. ( परत रडते )

**सुरेश** — अरे फेफरं कसलं ? - कुणाला आलंय फेफरं ? सरळ सांग काय ते लौकर. अण्णा येतील.

**शिवा** — कुणाला म्हंजे ? ह्या सुधाबाईंना ! थोरले शेठ आतां मला सांगून गेले. ते म्हनाले, हिला आजच फेपरं आलंय, लक्ष ठेव. म्हनून मी जोडा घेऊन आलांव !

**सुधा** — आजच फेपरं आलं म्हणून सांगितलं, कीं आजचे पेपर आलेत ते दे म्हणून सांगितलं तुला ? ( सुरेश मोठमोठ्यानें हंसतो. )

**सुरेश** — अरे शिवा, हिला आजचे पेपर्स दे म्हणून सांगितलं असेल अण्णांनीं ! फेपरं नव्हे – पेपर ! पेपर म्हणजे वर्तमानपत्र.

**शिवा** : साला हाय काय नि नाय काय ? आतां मस काय बरं ठावा हे ? मस काय विंग्रजी कलतंय ? सुधाबाई, चूक झाली माफी. आनतों आजचे कागद.

**सुधा** : कांहीं नकोत मला कागद नि बिगद ! जा तूं आपल्या कामाला. ( शिवा जातो. ) काय चालवलंत तुम्हीं हें ? काय करीत होतां त्या खोलींत इतका वेळ सरलला घेऊन ? कांहीं नाहीं, मी आपली अण्णांना सांगून टाकतें सगळं.

**सुरेश** — अग असा वेडेपणा करूं नकोस. सगळी फजिती होईल. आपलं काय ठरलंय ? ( सरल बाहेर येते तिला पाहून ) अग, तूं आणखी कशाला बाहेर आलीस ?

**सरल** — काय म्हणतेय सुधा ?

**सुधा** — काय म्हणजे ? माझ्या बरोबरच राहायला सांगतेंय् मी त्यांना.

**सरल** — अग पण सुधा —

**सुधा** — पण नाहीं नि बीण नाहीं. हे राहातील त्या खोलींत मी राहाणार ! मला काय कुणाची चोरी आहे ?

**सुरेश** — सुधा, सुधा–अशी राख घालून घेऊं नकोस डोकींत. सगळा रंगाचा बेरंग होईल बघ. अग तुला मला एकत्र राहातां यावं, म्हणूनच तर मी ही युक्ति करतोंय ना ? जा – जा तूं तुझ्या खोलींत.

[ इतक्यांत अण्णासाहेब येत असल्याची चाहूल लागते. सुरेश घाबरतो आणि सरलला एका खोलींत व सुधाला दुसऱ्या खोलींत ढकलून आपण तोंडानें शीळ घालीत इकडून तिकडे येरझारा घालतो. सुधाला आंत ढकलतांनाच अण्णासाहेब जानव्याचं पाणी काढीत तोंडानें कांहींतरी पुटपुटत हळूच येऊन चोरून पहातात.

**अण्णा** — अरे चोरा ! असला हलकटपणा करायला लागलास काय ?

**सुरेश** — काय झालं अण्णा ?

**अण्णा** — काय झालं ? कुणाला रे शीळ घालतो आहेस ? सुधेच्या नि तुझ्य अशा खुणा ठरलेल्या आहेत वाटतं ?

**सुरेश** — भलतंच ! कांहीं तरी काय बोलतां अण्णा ?

**अण्णा** — कांहीं तरीच काय ! कांहीं तरीच करतांना शरम वाटत नाहीं, कांहीं तरी बोललं म्हणजे मात्र शरम वाटते होय तुला ! शीळ कशाला घालीत होतास ?

**सुरेश** — शीळ ? ( थोडासा गोंधळून ) – मी – तीं – एका सिनेमांतलीं गाण शीळेंत म्हणण्याची प्रॅक्टीस करीत होतों मी !

**अण्णा** — अस्सं ! शीलवंत नाहींस म्हणून शीळवंत होण्याचा प्रयत्न कर आहेस वाटतं ? थांब. पोरट्या, तुझ्या बायकोलाच सांगतों. सरल, अग सरल बाहेर ये आधीं. ( सरल येते. ) काय ग, नवरा ताब्यांत ठेवतां येत नाहीं, त कशाला ग लग्न करतां तुम्ही ?

**सरल** — काय झालं अण्णा ?

**अण्णा** — अग तुझा डोळा चुकवून, हा इकडे ह्या सुधेच्या खोलीच दरवाज्याशीं घुटमळत होता. शीळसुद्धां घालीत होता तिला.

**सरल** — ( सुरेशाला ) इश्श ! असं काय भलतंच करायचं तें ?

**अण्णा** — बस – बस ! समजलं बायकोचं पाणी ! म्हणे ( वेडावून ) अच्यं क करायच्यं तें ! तूं सुद्धां अशी आहेस — अगदी ज्याचं नांव तें ! चांगला कान नि ने आंत ओढीत. असल्या बेरडांच्या बाबतींत, कॅांग्रेसच्या सभासदासार असं अहिंसातत्त्व पाळून चालायचं नाहीं. त्या सुधाला मीच सांभाळत ( हांक मारतो. ) सुधा —

**सुधा** — ( बाहेर येऊन ) काय अण्णासाहेब !

**अण्णा** — ( सरलला ) पाहिलंस, बिचारी किती साधीभोळी आहे ती ! बा तूं चल माझ्याबरोबर ! मी आहें. कांहीं घाबरूं नकोस तूं. ( सुरेशाला ) झालेल्या पुरुषावर आजकालच्या तरुणी फिदा होतात, म्हणून तशांतली न अरं ही सुधा ! सुधा, चल तूं माझ्याबरोबर ! मी तुला माझी लायब्ररी दाखवतों, च




**सुधा** — ( मागें पहात ) पण — पण —

**अण्णा** — पण काय ?

**सुधा** — सुरेश – सुरेश —

**अण्णा** — अग सांगितलं ना ? मुळींच घाबरूं नकोस त्याला. त्याची काय बिशाद लागलीय मी असतांना !

**सुरेश** — ( गडबडीनें ) पण – पण अण्णा, ती सरलची मैत्रिण आहे,–आपली पाहुणी आहे. तिला—

**अण्णा** — ओहो–तर तर ! काय पण काळजी करतोयस तूं ? ती सरलची मैत्रिण असली, तर सरल घेईल तिची काळजी. आणि आपली पाहुणी आहे, म्हणूनच मला ठेवली पाहिजे नजर तिच्यावर. समजलास ? तिचीच कां तुला एवढी काळजी लागलीय, कळतं बरं मला. लागला बनवाबनवी करायला ! लुच्चा कुठला ! सरल, अग अशी बावळटासारखी काय बघतेस माझ्याकडे ? ने त्याला तिकडे आंत – नि सोडूं नको गुलामाला. सुधा चल बाळ तिकडे. उद्यां मी तुला पोंचती करतों बरं.

**सुरेश** — पण अण्णा, तिला अजून हॉस्पिटल दाखवायचं आहे.

**अण्णा** — काय दाखवायचं तें सगळं दाखवायला मी समर्थ आहें. समजलास ?

**सुधा** — सुरेश, हें हो काय !

**अण्णा** — हां – सुधा, त्याचं आतां तोंडसुद्धां पाहूं नकोस. ( सुरेशला ) एका भाबड्या पोरीला फसवायला पाहात होतास काय ! मी आयत्या वेळीं आलों म्हणून बरं झालं. नाहीं तर – ? ( सुधाला ) तूं कांहीं भिऊं नकोस आतां. चल माझ्याबरोबर. ( सुरेशला ) लफंग्या कुठला ! ( तिला घेऊन जातात. )

**सुरेश** — ( सरलला ) मोठी पंचाईत झाली आतां. वैतागाच्या भरांत जर का सुधा सगळा खरा प्रकार सांगून मोकळी झाली, तर मात्र आपली कंबक्तीच भरली.

**सरल** — तरी मी म्हणत होतें, कीं, हें बरं नव्हे म्हणून. पण काय रे, अशोक कसे आले नाहींत अजून ?

**सुरेश** — हो ! बरी आठवण केलीस. विसरलोंच होतों मी तें. कुठं आहे तें पत्र ? ( हातांतलें घड्याळ पाहून ) अकरा वाजले. शिवा कुठं गेला ? शिवा, ये शिवा !

**शिवा**—( प्रवेश करून ) व्हय शेठ!

**सुरेश**—हें पहा, तुला एक काम सांगतों. हिचं नि माझं लग्न झालं कीं तुला मोठं बक्षीस देईन! पण आज मात्र एवढं काम केलं पाहिजे तूं.

**शिवा**—हें काय म्हनतांव शेट? रामचंद्रानं हुकूम करायचा नि हनुमंतानं तो पार पाडायचा! सांगा—कितीबी कटीन काम असलं, तरीबी करून दावतांव. सांगा.

**सरल**—पण शिवा, थोरल्या शेठनां कळवायचं नाहीं हं. तुझ्या साळूलासुद्धां सांगायचं नाहीं.

**शिवा**—ताईसायब, साला हाय काय नि नाय काय? ह्या कानाचं ह्या कानाला व्हायचं नाहीं. साला हा शिवा हाय कीं कोन हाय?

**सुरेश**—पण पेपरचं फेपरं केलंस, तसं नाहीं ना करणार?

**शिवा**—नाहीं–नाहीं शेट!

**सुरेश**—हें पहा, आतां इथं एक गृहस्थ येतील. ते आले, म्हणजे 'अण्णासाहेब कुठं आहेत' म्हणून विचारतील. त्यांना माझ्याकडे आणायचं. मीच अण्णासाहेब गोखले म्हणून सांगायचं त्यांना. आणि हा आपला बंगला आहे ना? तेंच वेड्यांचं हॉस्पिटल म्हणून सांगायचं!

**शिवा**—म्हनतांव काय शेठ? आपला बंगला येड्याचं इस्पितल? तो मानूस मलाच वेडा म्हनायचा!

**सुरेश**—हें पहा, आतां शंका कुशंका काढीत बसायचं नाहीं. करणार ना तूं एवढं काम? आमचं लग्न झाल्यावर मोठं बक्षीस!

**शिवा**—बरं तर! हा चाललांव!

**सरल**—वाटेलाच डोळे लावून बस बरं का! ( शिवा जातो. ) पण सुरेश, अशोकची नि तुझी ओळख तर नाहीं ना?

**सुरेश**—छे–छे! त्याची नि माझी तोंडओळखसुद्धां नाहीं. त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रसिद्ध झालेला त्यांचा फोटो मात्र पाहिलाय मीं.

**सरल**—सुरेश, पहा बुवा. तुझ्या कामासाठीं मी तुझी बनावट बायको झालें आहे. आतां माझ्या कामासाठीं तूं—

**सुरेश** — अग वेड्याच्या हॉस्पिटलचा व्यवस्थापक बनणार आहे ना मी ! तुला काय त्याचं ? अशोक पायां पडत तुझ्यावर प्रेम करूं लागतील असं करतों. मग तर झालं !

**सरल** — पण अशोक करतील का माझ्यावर प्रेम ? त्यांचा कांहीं तरी भलताच ग्रह झालेला आहे माझ्याबद्दल.

**सुरेश** — होतं कधीं कधीं तसं. आपलेच ग्रह वाईट आले, कीं आपल्याबद्दल कुणाचे कसे ग्रह होतील, तें कांहीं सांगतां यायचं नाहीं. अशोकच्या नि तुझ्या बाबतींत तसंच झालं आहे. आतां तुझे ग्रह पालटलेत म्हणून समज. आतां भलताच ग्रह करून घेतलेला अशोक, लग्न करण्यासाठीं उलट तुलाच आग्रह करील. माझं भविष्य कधींच खोटं व्हायचं नाहीं. पहा तर खरी गंमत ! मात्र सांगितलं तसं सोंग घ्यायचं. खुणा केल्याबरोबर गाणं म्हणायचं नि ' सांभाळा सांभाळा ' म्हटल्याबरोबर बाहेर येऊन चाळे करायचे.

**सरल** — मला कसं अगदीं वेड लागल्यासारखंच झालंय.

**सुरेश** — शू - ! ते पहा - शिवा बरोबर ते अशोकच येताहेत. चल हो तूं आंत. कैसांबिस सोडून वेडी हो.

**सरल** — [ आंत जातां जातां ] वेड लागायचीच पाळी आलीय आतां.

[ सुरेश दुसऱ्या खोलींत जातो. शिवा नि अशोक प्रवेश करतात.

**अशोक** — ( इकडे तिकडे पहात ) कुठं आहेत अण्णासाहेब ?

**शिवा** — बसा इतं. बोलावतांव त्यांना. ( आंत जातो )

**सुरेश** — ( प्र. करून ) नमस्कार - नमस्कार ! ( अशोक नमस्कार करतो. ) जरा कामांत होतों मी.

**अशोक** — आपल्या कामांत व्यत्यय आला वाटतं माझ्या येण्यानं !

**सुरेश** — छे छे ! तसं कांहीं नाहीं. अहो, ह्या वेड्यावर देखरेख करणं, मोठं दगदगीचं काम असतं बघा.

**अशोक** — होय तर. दगदगीचं तसंच जोखमीचांहि आहे.

**सुरेश** — तें कांहीं विचारूं नका. पण अशा गोष्टीकडे आपल्यासारख्या सुशिक्षित लोकांनीं द्यावं तसं लक्ष दिलं नाहीं, म्हणून तर आपल्या समाजांत वेड्यांचं प्रमाण वाढत चाललं आहे. आपल्यासारख्या श्रेष्ठ दर्जाच्या कादंबरीकाराचे पाय

आमच्या ह्या हॉस्पिटलला लागले, ह्याबद्दल सर्व वेड्यांच्या तर्फे मी आपले आभार मानतों.

**अशोक** — त्यांत कसले आभार मानायचे माझे ? वेड्यांच्या हालचालींचें नीट निरीक्षण करून, त्या विषयावर एखादी हृदयस्पर्शी कादंबरी लिहावी, असा माझा मानस आहे. आणि म्हणूनच आपल्याकडे वेड्यांचं हॉस्पिटल पाहाण्याची परवानगी मागितली. आणि ती परवानगी देऊन वास्तविक आपणच माझ्या-वर उपकार केलेले आहेत.

**सुरेश** — तसं कसं म्हणतां ! आम्ही इथल्या वेड्यांवर मानसशास्त्र लक्षांत घेऊन जे नव्या नव्या पद्धतींचे उपचार करतों, ते आपल्यासारख्या थोरा-मोठ्यांनीं पहावे, हीच तर आमची इच्छा असते. आपण वेड्यांच्या जीवनावर कादंबरी लिहिणार हें ऐकून, आमच्या श्रमांचं सार्थक होणार, असं वाटायला लागलं मला. वेड्यांच्या जीवनावरची आपली हृदयंगम कादंबरी वाचून लोक खात्रीनें वेडे होतील ! आमच्या ह्या हॉस्पिटलांत कीं नाहीं, अनेक तऱ्हेचे वेडे पुरुष नि वेड्या बायका असतात. कुणी बोलतात, कुणी बोलतच नाहींत. ( साळू खलबत्ता घेऊन एका बाजूनें येते व दुसऱ्या बाजूला जाते. अशोक तिच्याकडे पहात रहातो. ) आतां हीच पहा ना. हीसुद्धां एक वेडीच आहे. ही बोलतबिलत नाहीं. सारखी कांहीं ना कांहीं कुटीत असते ! ( दोघेहि हंसतात ) कित्येकांना तर कशाचा ना कशाचा ध्यासच लागलेला असतो. कुणाला संगीतीचा, तर कुणाला संपत्तीचा ! तर कुणाकुणाला संततीचाच !

**अशोक** — त्यांना सांभाळतां सांभाळतां नाकीं नऊ येत असतील तुमच्या, नाहीं ?

**सुरेश** —होय तर ! तशांत एखादा वेडा असा कांहीं इरसाल असतो,-अहो हॉस्पिटललाच आग लावून द्यायला कमी करायचे नाहींत हे वेडे ! पांचांवर धारण बसते एककदां माझी ! पण करतां काय ? लोककल्याणासाठीं करावे लागतात कष्ट ! एकेकदां हे वेडे असे कांहीं भंडावून सोडतात मला, कीं बस्स !—ज्याचं नांव तें ! [ आंत सरल गाऊं लागते.

**अशोक** — हा आंतला आवाज कुणाचा ? कोण गातं आहे आंत ?

**सुरेश** — ( ऐकल्यासारखं करून ) हां–हा आंतला आवाज एका वेडीचा ! ती एक वेडी तरुणी आहे—एक सारखी आपली गात बसते. तिला आपलं

गाण्याचंच वेड ! एरवी फार गरीब. दंगामस्ती चुकूनसुद्धां करायची नाहीं. जुन्या गाण्यांना नव्या चाली लावणं, हेंच तिला वेड !

**अशोक** — आवाजसुद्धां किती गोड आहे, नाहीं ?

**सुरेश** — अगदीं कोकिळेसारखा ! रंगानेंहि जरा काळसरच आहे. मी तिला कोकिळाच म्हणतों. ही वेडी इथं आल्यापासून, हें वेड्यांचं हॉस्पिटल आहे, कीं एखादें संगीत विद्यालय आहे, असाच प्रश्न पडायचा एखाद्याला !

**अशोक** — फक्त गाते ?—बोलत बिलत नाहीं वाटतं ?

**सुरेश** — मनाला आलं तर बोलतेसुद्धां. पण काय बोलते, तें मात्र नीटसं समजत नाहीं. तारेच्या शब्दाप्रमाणं तुटक तुटक बडबडते. इतकं मात्र खरं कीं, कोणी तरी तिचा प्रेमभंग केलेला असावा ! ऐका–आवाज जवळ जवळ येऊं लागला. मला वाटतं इकडेच येतेय ती. अशोक, मी जातों आंत. तुम्ही खुशाल गंमत पहा तिची. मी इथं असलों, तर कदाचित् संतापेल ती. तुम्हाला कांहीं तिला विचारायचं असलं तर जरा बेतानंच विचारा हं. कांहीं घाबरण्याचं कारण नाहीं. आलीच ती—मी जातों आंत. सांभाळा — सांभाळा — ! [ सुरेश आंत जातो. सरल गातगात प्रवेश करते.

**अशोक** — ( चमकून ) कोण ? सरलच ही ! आणि वेडी ?

**सरल** — ( गात गात प्रवेश करते. )

पद

**मी भोळीखुळी बाला ॥ कां हो उगाच रुसलां ॥ ध्रु० ॥**
**तळमळे जीव हा सखया ॥ कशि ना मुळींच माया ॥**
**अजि सोडुनी अबोला ॥ वद गोड गोड बोला ॥ १ ॥**

( गाणें संपल्यावर तिथल्या कोच–खुर्च्यांना कवटाळूं लागते. वेडेवांकडे हातवारे करूं लागते. )...सांगा ना !–बोला ना !–करणार ना माझ्याशीं लग्न ?–करणार ना तुम्ही माझ्यावर प्रेम ?–प्रेम–लग्न ! ( मोठमोठ्यानें हंसते. परत गंभीर होऊन ) मी तुमच्यावर प्रेम करणार ! तुम्ही करणार ना माझ्यावर प्रेम ? ( खुर्चीशीं बोलत बसते. )

**अशोक** — अरेरे ! काय ही दशा ! च्—च्—च्—च् !

**सरल** — ( ओरडून ) प्रेम–प्रेम ! अशोक–प्रेम !

**अशोक**—अशोक ! म्हणजे माझ्यासाठीं वेडी झाली ? ( पुढें होऊन ) सरल, मला ओळखलंस ? तूं माझ्यासाठीं का वेडी झालीस ? माझ्या प्रेमासाठीं का तूं वेडी झालीस ?

**सरल**—( संतापानें ओरडते. अशोक दचकून मागें होतो. ) दूर हो ! तू कोण ? –कोण तूं, बोल—

**अशोक**—सरल–मी अशोक ! तुझा लाडका अशोक.

**सरल**—खोटं बोलतोस ? माझा अशोक इथं कशाला येईल मरायला ? हें वेड्यांचं हॉस्पिटल–इथं वेडे येतात. अशोक–माझे अशोक शहाणे आहेत–वेडे नाहींत.

**अशोक**—नाहीं. सरल, तुझा अशोक वेडाच आहे. तो शहाणा असता, तर तुला असं वेड खात्रीनं लागलं नसतं. तुझा धिक्कार केला, सरल मीं वेडेपणाच केला. मला पश्चाताप होतो आहे. सरल, क्षमा कर मला. माझं तुझ्यावरच प्रेम आहे ! बोल ना ग जरा !

पद

**तूं बोल साजणी । बघसी कां रुसुनी ॥ ध्रु० ॥**
**वरि अस्मानीं बिजली राणी । जाइ जशी चमकोनी ॥**
**तशिच एकदां हांस खदखदा । पाहिन डोळे भरुनी ॥**
**तूं फुलराणी भृंग खुळा मी । येई तुझ्या मागोनी ॥**
**चल ये सजणी तूं मी मिळुनी । गाऊं प्रितीचीं गाणीं ॥ १ ॥**

[ सुरेश प्रवेश करून सरलकडे रागानें पाहून खाकरतो.

**सुरेश**—( सरलला ) काय चाललंय इथं ? अरे वाः ! ( सरल आंत पळत जाते ) पाहिलंत अशोक ! मला कशी अगदीं वचकून असते. किती सुंदर आहे, नाहीं ? तिचा प्रेमभंग करून, तिला अशी वेडी बनविणारा तिचा तो भामटा प्रियकर जर मला मिळाला असता, तर चाबकाच्या फटकाऱ्यांनीं पाठ फोडून काढली असती त्याची !

**अशोक**—( खजिल होऊन ) अण्णासाहेब, पुरुषांची जात निष्ठुर खरी. पण कां हो, ती एकेकदां शहाण्यासारखी बोलते, तें कसं काय ?

**सुरेश**—( हंसत ) अहो हीच तर गंमत आहे. वेड्यांचं मनासशास्त्र फार निराळं असतं. आणि तसं पाहिलं, तर शहाणीं माणसं नि वेडीं माणसं यांत फारसा फरक

नसतोच मुळीं. फरक इतकाच कीं, वेडीं माणसं मधूनमधून शहाण्यासारखीं बोलतात, नि शहाणीं माणसं मधूनमधून वेड्यासारखीं बरळतात ! वेडाची लहर असते. ती कुणाला, कधीं नि कशी येईल, याचा नेम नसतो. हीं वेडीं माणसं कितीहि शहाण्यासारखीं बोललीं, तरी शहाण्या माणसांनीं त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवण्याचा वेडेपणा करूं नये.

**अशोक** — नाहीं हो अण्णासाहेब, ती खरोखरच चांगल्या माणसासारखी बोलत होती. मला समजलं तिचं बोलणं.

**सुरेश** — ( हंसून ) चोराचीं पावलं चोरालाच समजतात, तसं वेड्याची भाषा वेड्यालाच समजते म्हणायची ! अशोक, वेडे आहांत तुम्ही ! तुम्ही साहित्यिक फार भावनाप्रधान असतां हेंच खरं. श्रीमंत लोक जसे गरिबांच्या माना मुरगळून मुंग्यांना साखर घालीत फिरतात, तसेच तुम्हीं साहित्यिक ! इकडे माणसाचे मुडदे पडत असले तरी तिकडे डोळेझांक करून, मेलेल्या मुंगी-वर पाय पडला म्हणून शोकगीतांचे संग्रह प्रसिद्ध कराल ! राग नका हं मानूं. अहो, इतकं भावनाप्रधान होऊन चालत नसतं अशोक. तुमच्या चेहऱ्यावरून एखाद्याला वाटायचं कीं तुम्हींच तिचा प्रेमभंग केला आहे !

**अशोक** — ( लटकें हंसें आणून ) अण्णासाहेब, आपण म्हणतां तें अगदीं बरोबर. फार म्हटल्या फारच भावनाप्रधान आहे मी. आपण एवढ्याशा वयांत फार अनुभव घेतलेला दिसतो जगाचा. माझी कल्पना होती कीं, आपण कोणी तरी पोक्त गृहस्थ असाल ! ( दोघेहि हंसतात. ) मी श्रीमंत असतों, तर ह्या वेडीच्या स्वतंत्र व्यवस्थेसाठीं एखादी मोठी रक्कम आपल्या स्वाधीन केली असती !

**सुरेश** — छे–छे–छे–भलतंच ! अहो आपल्यासारख्यांनीं असे उद्गार काढणं, म्हणजे प्रत्यक्ष रकमेपेक्षांही ते आम्हांला मोलाचे वाटतात. आपलं उत्पन्न किती नि आपण देणगी कशी देणार ?

**अशोक** — म्हणजे आमच्यासारख्या साहित्यिकांच्या परिस्थितीचीसुद्धां कल्पना आहेच म्हणायची आपल्याला !

**सुरेश** — चांगली कल्पना आहे. माझे एक साहित्यिक मित्र आहेत. ते तर सप्रेम भेट म्हणून अभिप्रायार्थ आलेलीं कोरीं पुस्तकं, ताबडतोब अर्ध्या किंमतीस विकतात नि उपजीविका करतात ! ( समोरून येणाऱ्या अण्णांना पाहून ) हो–तो पहा एक वेडा येतोय इकडे. बिचारा म्हातारा आहे. त्याला वाटतं आपणच

ह्या बंगल्याचे नि बगिचाचे मालक ! मुलगा आणि मुलाचं लग्न, हेंच वेड त्याच्या डोक्यांत एकसारखं. संततीचं वेड आहे हें.

**अशोक** — बिचाऱ्याचा मुलगा मेलाबिला असेल, आणि पुत्रशोकाच्या अतिरेकानं डोक्यावर परिणाम आला असेल त्याच्या. दुसरं काय ?

**सुरेश** — पहा तर खरी त्या वेड्या म्हाताऱ्याची गंमत ! तो मालकाचा आव आणील काय, गडीमाणसांना हांका मारील काय, स्वतःच्या श्रीमंतीचा डौल दाखवील काय, आणि शेवटीं तुम्हांलाच वेडा ठरवील ! ( दोघेहि हंसतात ) वेड्याशीं वागणं मोठं कठीण काम असतं. काय करतां ? त्यांच्याच कलाकलानं घ्यावं लागतं सगळं. हा वेडा म्हातारा मला म्हणतो आपला मुलगा आणि आपणच म्हणतो अण्णासाहेब गोखले.

**अशोक** — असं ? म्हातारा मोठा गंमतीदार आहे म्हणायचा !

**सुरेश** — आणि माझ्याच लग्नाच्या वाटाघाटी करीत असतो. ( दोघेहि हंसतात. ) आला बरं का तो. जातों मी आंत. जरा जपून बोललांत कीं कांहीं करायचा नाहीं. आलाच – जातों मी. [ आंत जातो.

**अण्णा** — ( प्रवेश करून ) काय करतोय कारटा ? ( अशोकला ) कोण आपण ? काय पाहिजे आपल्याला ?

**अशोक** — ( थट्टा करण्याच्या उद्देशानें ) आपलं दर्शन.

**अण्णा** — हें पहा, अशी वेड्यासारखीं उत्तरं देऊं नका.

**अशोक** — वेड्यासारखीं ! वेडा कोण ? मी कीं तूं ?

**अण्णा** — अरेच्चा ! मलाच वेडा ठरवायला लागलास ? डोकंबिकं फिरलं कीं काय तुझं ?

**अशोक** — ( मोठ्यानें हंसतो. ) काय हो आजोबा, कसं लागलं वेड तुला ? मुलगाबिलगा वारला कीं काय तुझा ?

**अण्णा** — हां खबरदार असं कांहीं अभद्र बोलशील तर ! कोण रे तूं उपटसुंभ ?– आणि कसा आलास माझ्या घरांत ?

**अशोक** — ( हंसत ) तुझं घर ? – वेडा बिचारा ! आपलंच घर समजतोय ! अण्णासाहेब म्हणाले तें अगदीं बरोबर !

**अण्णा**—अण्णासाहेब म्हणाले ! कुठले अण्णासाहेब आणखी दुसरे ? आहे तरी काय हें गौडबंगाल ? तो कारटा बायकोला सोडून भलत्याच पोरीशीं लघळपणा करतो ! तूं आलास तो मलाच वेडा ठरवूं लागलास ! काय झालं तरी काय सगळ्यांना ? माझं डोकं फिरलं कीं तुमची सगळ्यांची डोकीं फिरलीं ? सारंच गौडबंगाल !

**अशोक**—काय हो आजोबा, तुमचा हा बंगला दाखवाल कीं नाहीं आम्हाला ?

**अण्णा**—असं सरळ विचार. हं–पहा–पहा हा माझा बंगला. तो बाजूचा बगीचाहि माझाच ! तोहि पहा.

**अशोक**—वाः ! किती छान आहे !

**अण्णा**—किती पैसा ओतलाय त्या बागेंत ? उगीच नाहीं सुंदर दिसत !

**अशोक**—पण कां हो आजोबा, तुमचं घर कुठं ? कधीं आणून टाकलं तुम्हांला इथं ?

**अण्णा**—अरेच्या ! परत डोकं फिरलं कीं काय तुझं ? अरे वेड्या, हेंच माझं घर !

**अशोक**—अरेरे ! बिचारा अगदींच वेडा ! म्हणे आपलं घर !

**अण्णा**—( संतापानें ) माझं घर नव्हे, तर काय तुझ्या बापाचं ? मला वेडाबिडा म्हणशील, तर थोबाड फोडून टाकीन ! अरे वाः ! आहे तरी काय हें गौडबंगाल ? शिवा, दे याला हांकलून.

**अशोक**—( परत मोठ्यांदां हंसून ) अगदींच वेडा खरा. नोकर चाकरसुद्धां आपलेच समजतोय बिचारा ! ( अण्णांच्या हातांतलीं सलकडीं पाहून ) पाहूं–पाहूं हातांत काय तें ?

**अण्णा**—हीं ?–सलकडीं तीं ! हीं पहा. असले आणखी चार जोड आहेत घरांत. मुलाच्या लग्नांत दागिने करणार मी माझ्या सुनेला ! ( सलकडीं अशोककडे देतात. )

**अशोक**—( घेतां घेतां ) पितळेचीं सलकडीं देऊन समजूत केलेली दिसते ह्या वेड्याची ! ( निरखून ) आँ ! हीं तर खऱ्या सोन्याचीं सलकडीं ! तुझ्यासारख्या वेड्याकडे कोणी दिला एवढा ऐवज ?

**अण्णा**—अरे वा रे भामट्या ! मला वेडा ठरवून हीं सलकडीं लांबवायचा विचार आहे वाटतं ? अँ ? आण तीं इकडे ! [ अशोक देत नाहीं. दोघांची

हिसकाहिसकी होते. अशोक जोराचा हिसका देऊन सलकडी घेऊन पळून जातो. अण्णा 'चोर चोर' म्हणून ओरडतात. ] अरे धांवा ! चोर–चोर ! पळाला. शिव्या– रे शिव्या, अरे सुरेश – ! ( शिवा धांवत येतो. ) अरे धांव आधीं. तो पहा, तो चोर माझीं सलकडीं घेऊन पळाला.

**शिवा** — साला हाय काय नि नाय काय—

[ शिवा अशोकच्या मागें पळत जातो. सुरेश बाहेर येतो. ]

**अण्णा** — काय रे कारट्या, काय करीत होतास आंत इतका वेळ ? इकडे मी सारखा शंख करतो आहे – दाद ना फिर्याद ! हो – आतां तुला काय ? बायको मिळाली ना, संपलं सगळं ! मरेना का बाप तिकडे !

**सुरेश** — म्हणजे असं झालं तरी काय अण्णा ?

**अण्णा** — काय झालं ? अरे आतां तो एक भामटा माझीं सलकडीं घेऊन पळाला ! प्राण घेऊन गेला असता तरी हरकत नव्हती, पण तो सोनं घेऊन पळाला.

**सुरेश** — सोन्याहून पिवळं झालं अण्णा ! प्राणावरचं सोन्यावर निभावलं ! गेलं तर गेलं सोनं – लाखाचा प्राण वांचला हेंच नशीब समजा !

**अण्णा** — ( वेडावून ) काय पण लाख बोललास ! तुझ्यासारखा दिवटा लाखांत एकसुद्धां सांपडायचा नाहीं. म्हणे लाखाचा प्राण वांचला ! अरे गाढवा, प्राणाची किंमत खूप लाख असेल ! पण सोनं तें सोनं नि लाख ती लाख ! – आणि काय रे, बायको कुठं आहे ?

**सुरेश** — अहो अण्णा, तुम्हींच नाहीं का तिला तुमची ती लायब्ररी दाखवायला घेऊन गेलां आंत ?

**अण्णा** — अरे पोरट्या ! ती सरलची मैत्रिणच घोळतेय वाटतं तुझ्या डोक्यांत अजून ! ऑं ? अप्सरेसारखी बायको असतांना, अरे तुला लागलं तरी कसं हें वेड ?

**सुरेश** — ( जीभ चावून ) नाहीं – अण्णा – तसं – नाहीं.

**अण्णा** — तसं नाहीं तर कसं ? सांग कर सांग ! कारट्या, अशा गुणांनीं एखादे दिवशीं काळं फासशील माझ्या तोंडाला ! कशाला माझ्या पोटीं जन्माला आलास ?

**सुरेश** — भलताच आळ घेतां तुम्ही अण्णा माझ्यावर ! तुमच्या पोटीं कुठं जन्म घेतला मीं ? मीं आपला माझ्या आईच्या पोटीं जन्म घेतला !

**अण्णा**—( थापट उगारून ) देऊं कारे एक ठेवून? उत्तर देतो आणखी! ( शिवा सलकडीं आणून देतो नि आंत जातो ) आणलींस? ठीक–आतां कुठं जिवांत जीव आला. तो कोणसा भामटा येतो काय, मला वेडा ठरवतो काय नि सलकडीं घेऊन पसार होतो काय! आणि तूं–तूं तर त्या सुधेच्याच चिंतनांत! काय आहे तरी काय हें गौडबंगाल! डोकं फुटायची पाळी आली.

[ दोन्हीं हातांनीं डोकें धरून घरांत जातात. सुरेशहि जातो. शिवा नि साळू प्रवेश करतात.

**साळू**—चाललंय तरी काय हें आज? धाकटे शेट आल्यापासनं निरालंच झालंय सगळं!

**शिवा**—अग मीबी तेंच म्हणतांव! तुजंबी सगळं निरालंच दिसतंय आज! तुजी नजर कुटं हाय थाऱ्यावर! भात करतेस फलफलीत नि डाल करतेस बुलबुलीत! साला हाय काय नि नाय काय! धाकट्या शेठवर तर डोला नाय ना?

**साळू**—बाय–बाय–बाय! बोलतांव तरी काय तुमी? त्या दोन चिमन्या आल्यापासून तुमचाच डोला नाय ठिकानावर! अनि मस बोलतांव काय! काय बाय तरी!

**शिवा**—अग साला मी पुरुस हाय काय कोन हाय? कसा असल माझा डोला ठिकानावर! ती सरलाबाई कशी अगदीं हंसत हंसत बोलते माज्याबरोबर! अग उगीच नाय! तिचा डोला हाय माज्यावर! पन मी काय असा वाटेवर पडलोंय काय? पन हें बग, शेट म्हनतात आमचे धाकटे शेट त्या सुधाताईच्या मागं लागतात म्हणून—

**साळू**—बायको सोडून त्या दुसऱ्या पाकराच्या मागं लागतात? काय बाय तरी!

**शिवा**—पन मी म्हनतांव हे चांगले शिकले सवरलेले लोक, पोरींच्या मागं काय लागतात? तंवा साळू तूंबी जरा जपून! नाय तर धाकटा शेट हाय तरना बांड! आणि मीं? साला हाय काय नि नाय काय! तुला ठावं हाय? तूं पाया पडाया आलीस, तवां धाकटे शेट काय म्हनाले ठावं हाय तूस? 'शिवाजी मागारीन चांगली हाय नाय?' तवांच म्यां ओलकलं!

**साळू** — बाय बाय बाय बाय ! म्हनतांव तरी काय तुमी ? मी काय ही हाय व्हय ! बाय बाय ( रडूं लागते. )

**शिवा** — अरेच्चा ! साला रडतांव काय ! आँ ? अग रडायचं असतं शिरिमंतांनीं ! आपण गरीबांनीं हंसायचं असतं, समजलं ! आपण हंसत जगायचं नि हंसत मरायचं ! येड्यासारखी रडतेस काय ? उगि उगि–माजी साळू ती ! ( तिला जवळ घेतो. ) तूं माजी रानी नि मी तुझा राजा ! साला हाय काय नि नाय काय !

पद

तुझी माझी जोडि सोभे छान ग ।
मी चुना आनि तूं पान ग ॥ धृ० ॥
पुरे पुरे तुमची फसवी माया ।
साला हाय काय नि नाय काय ग ॥ १ ॥

---

## प्रथमार्ध समाप्त



# बनावट बायको

## द्वितीयार्ध

[ अण्णासाहेब गोखले यांच्या बंगल्यासभोंवतालचा अत्यंत रमणीय असा सुंदर बगीचा. मधोमध कारंजा, बाजूस सुशोभित लतामंडप. सुरेश व अशोक बोलत बोलत प्रवेश करतात.

**सुरेश** — अहो, मीं सांगितलं नव्हतं तुम्हाला ? झाली तुमची खात्री ?

**अशोक** — झाली बुवा खात्री.

**सुरेश** — अशा वेड्यांशीं गांठ असते माझी ! बरं तर बरं – एखादे वेळीं प्राणसुद्धां घ्यायला कमी करायचे नाहींत हे वेडे.

**अशोक** — खरोखरच कमी करणार नाहींत. आज सोनं घेऊन पळाला, उद्यां जीव घेऊन पळेल हा थेरडा ! त्याचा काय नेम ?

**सुरेश** — नेमकं बोललां ! आज जर तुम्ही आला नसतां अशोक, तर मी नाहक बुडालों असतों. अहो आजकाल सोन्याचा भाव म्हणजे मारुतीच्या शेपटासारखा वाढतो आहे सारखा. आणि अशा ह्या धकाधकीच्या दिवसांत जर का तो सलकड्यांचा जोड गेला असता, तर काय बरं झालं असतं ? अशोक, तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण मी कष्ट तर करतोंच परंतु कष्ट करून शिवाय काटकसरसुद्धां करतों.

**अशोक** — अहो हें दिसतंच आहे. त्या शिवाय का हा शेंकडों रुपयांचा सलकड्यांचा जोड होईल ?

**सुरेश** — मला लोक म्हणतात चिक्कू ! हो – लोकांना काय ? पण मी लोकनिंदेला न जुमानतां कमवतों नि जमवतों, म्हणून माझा संसार असा सोन्याचा दिसतोय बरं !

**अशोक** — आजच्या तरुणपिढीला खरोखरच आदर्श आहांत तुम्ही !

**सुरेश**—कसला आलाय आदर्श नि कसलं काय ! पण माझा ह्या तरुणांना नेहमीं एकच संदेश असतो.

**अशोक**—कोणता तो ?

**सुरेश**—बाबांनो, कमवा नि जमवा—कमवा नि जमवा ! अशोक, माझा हा संदेश दिसण्यांत सोपा असला, तरी आचरणांत आणायला महा कठीण बरं ! अहो कमवणं सोपं असतं पण जमवणं कठीण असतं. हल्लींचे तरुण कमवतात, पण जमवायला विसरतात ! ते फक्त कमवतात नि गमवतात ! जमवायचं जमत नाहीं त्यांना.

**अशोक**—काय पण त्या म्हाताऱ्याचं धाडस ?

**सुरेश**—धाडस म्हणजे काय ? डल्लाच मारला होता त्यानं चांगला. अहो, तो म्हाताराच खाष्ट आहे मोठा. पहा ना, हातोहात लांबवली होती त्यानं माझी सलकडीं ! तुम्हीं तीं त्याच्या हातांतून हिसकावून घेतली नसतीं, तर अशोक, आज बुडालों असतों मी !

**अशोक**—मी जेव्हां तीं सलकडीं घेऊन पळूं लागलों, तेव्हां उलट मलाच ' चोर चोर ' म्हणून ओरडूं लागला. ( दोघेहि हंसतात. )

**सुरेश**—अहो, तें तसंच व्हायचं. आपण वेडा असतांनासुद्धां त्यानं तुम्हालाच नाहीं का वेडा ठरवला ! तसंच आपण चोर असतांना त्यानं तुम्हाला चोर ठरवलं ! ( हंसतो. )

**अशोक**—आतां तरी जपून ठेवा बरं का तुमचा सर्व ऐवज. नाहीं तर कधीं हा तुमच्या हातावर तुरी देईल, त्याचा पत्ता देखील लागायचा नाहीं.

**सुरेश**—जपून म्हणजे काय ?—चांगला कुलपांतच घालून टाकतों आतां ! हो, बरी आठवण झाली. तो आमचा गडी शिवा,—तोसुद्धां वेडाच आहे बरं कां !

**अशोक**—वेडा ? नाहीं हो—कांहीं तरी सांगतां तुम्ही. तो कुठं आहे वेडा ?

**सुरेश**—अहो, वेडा म्हणजे तसा वेडा नाहीं.

**अशोक**—तर कसा ?

**सुरेश**—तो पूर्वी वेडा होता. आतां बराच सुधारला आहे.

**अशोक**—पण त्यानं तर मला बरोबर तुमच्याकडे आणलं.

**सुरेश** — अशीं कामं मी मुद्दामच त्याला सांगतों. कारण असलीं कामं त्यानं नीट केलीं, कीं मग आम्ही खात्री करून घेतों कीं याचं डोकं ठिकाणावर आलं! पण अद्याप पूर्णपणें कांहीं त्याचं डोकं ठिकाणावर आलेलं नाहीं. हें एवढ्याचसाठीं कीं, कदाचित त्यानं कांहीं तुम्हाला सांगितलं, तर लगेच विश्वास ठेवूं नका त्याच्या शब्दावर! हो–त्याला काय? वाटेल तें सांगेल तो! बोलून चालून माजी वेडा!

**अशोक** — म्हणजे तोहि धड शहाणा नाहीं म्हणायचा!

**सुरेश** — अं–हं!

**अशोक** — कसे बुवा तुम्ही ह्या वेड्यांच्या बाजारांत दिवस काढतां कोण जाणे! माझ्यासारख्याला तर दोन दिवसांत वेड लागायचं!

**सुरेश** — (स्वगत) वेड्याला काय आणखी शिंगं असतात?

[ दुसऱ्या बाजूनें कुठून तरी सरल गात असल्याचा आवाज ऐकूं येतो. अशोक सुरेशचें लक्ष तिकडे वेधून कान लावून ऐकतो.

**सुरेश** — आहे बुवा! घ्या ऐकून पोटभर गाणीं! गाण्याबिण्याचा कंटाळा नाहीं ना येत तुम्हाला?

**अशोक** — छे छे! मलाहि गाण्याचं वेड आहे थोडंसं.

**सुरेश** — अस्सं? तर मग छान जमेल तुमचं त्या वेडीशीं! गाण्याचं वेड आणि वेडीचं गाणं!

**अशोक** — मला वाटतं इकडेच येतेय ती वेडी!

**सुरेश** — बहुतेक इकडेच येत असावी! पण मी असतांना यायची नाहीं ती इथं.

**अशोक** — अण्णासाहेब, कृपा करून तुम्ही जरा बाजूला जा. येऊं दे तिला इथं. काय काय करते पाहूं तर खरं!

**सुरेश** — (मुद्दामच) छे छे. अहो ती इकडे येऊन काय वाटेल तें करील! आणि तुम्ही नुसते पहात बसणार?

**अशोक** — पाहूं तर खरं! मला वेड्याच्या हालचालीचं निरीक्षण करायचंच आहे.

**सुरेश** — वेडे आहांत तुम्ही. अहो ह्या वेड्यांच्या नादाला तुम्ही काय लागतां? तिच्या हालचालीचं निरीक्षण करतां करतां तुमचेच हाल होतील. ती वेडी म्हणजे कांहीं कमी समजूं नका तुम्ही. चांगल्या चांगल्या शहाण्यांनासुद्धां वेड लावील!

**अशोक**—( गयावया करीत ) नाहीं–नाहीं–अण्णासाहेब, तेवढी मेहेरबानी कराच तुम्ही ! जाच तुम्ही बाजूला.

**सुरेश**—अं–हं ! मुळींच नाहीं. अशोक, परत तुम्ही भावनाप्रधान होऊं लागलां. अहो बरं तर बरं–एखादे वेळीं पिसाळली बिसाळली तर हैराण करून टाकील तुम्हांला ! माहीत आहे ?

**अशोक**—अण्णासाहेब, नाहीं हो ? तुमचा गैरसमज झालाय तिच्याबद्दल. ती वेडी असली तरी फार शहाणी आहे.

**सुरेश**—( हंसून ) फार शहाणेच आहांत ! तुमचाच कांहीं तरी गैरसमज झालाय. अहो घडघडीत वेडीला तुम्ही शहाणी म्हणतां ? काय म्हणावं तुम्हाला ?

**अशोक**—अण्णासाहेब, काय वाटेल तें म्हणा मला ! पाहिजे तर वेडा म्हणा मला, पण येऊं दे तिला इथं.

**सुरेश**—हें पहा, तिला येऊं दे पाहिजे तर इथं. पण तुम्हाला वेडा म्हणायला मात्र सांगूं नका मला. कारण ह्या वेड्यांच्या हॉस्पिटलांत आतां मुळींच जागा नाहीं. सगळं भरून गेलं आहे. अशा स्थितीत आणखी तुम्ही वेडे झालां, तर तुम्हाला कुठं ठेवूं मी ? ( हंसतो. ) राग मानूं नका हं ! जरा गमतीनं बोललों. बरं जातों मी–बंगल्यांतच जातों मी. हो–त्या म्हाताऱ्यावर नजर ठेवली पाहिजे मला.

[ सुरेश जातो. अशोक सरल असलेल्या दिशेकडे पहात हळहळतो.

**अशोक**—खरंच ! अण्णासाहेब म्हणाले तें अगदीं बरोबर. माझाच गैरसमज झाला होता आतांपर्यंत.

[ सरल वेड्यासारखे चाळे करीत गात गात येते.

पद

**प्रेम धनाची भिक्षा दे मज आलें तुझिया दारीं ॥ ध्रु० ॥**
**आज तरी मज दूर लोटुनी, धाडुं नको माघारी ॥**
**माड्या मजले नको सख्या मज शालु नको जरतारी ॥**
**तुझ्या चिंतनीं राहिन रंगुनि, आस जिवा ही भारी ॥ १ ॥**

**अशोक**—( जवळ जाऊन ) सरल !

**सरल**—( अशोककडे न पहातांच ) अशोक, माझ्याविषयीं तुमचा गैरसमज झाला आहे हो. ( ' गैरसमज, गैरसमज ' असें हळूहळू पुटपुटते. )

**अशोक**—( सरल पुटपुटत असतांना ) खरंच सरल, माझा आतांपर्यंत खरोखरच गैरसमज झाला होता —पण आतां माझी चूक मला कळून आली.
**सरल**—( अशोकडे न पहातां ) माझ्या जिवा, तुझ्यासाठीं मी तळमळतें आहे रे सारखी ! माझ्या पंचप्राणांचं फूल पिळून, तुझ्या मनगटावर मी प्रेमाचं अत्तर लावीन.
**अशोक**—अरेरे !
**सरल**—माझ्या लाडक्या अशोकच्या पायाखालीं, मी माझ्या नाजुक देहाची पायघडी घालीन—
**अशोक**—( गहिंवरून ) सरल, सरल—नको ग असं बोलूं ! पहा—[ तिच्या समोर जातो; ती सारखी इकडे तिकडे नजर लावून हळूहळू फिरते. तो तसतसा तिच्यासमोर रहाण्याचा प्रयत्न करतो. ] पहा मला नीट ! लाडके, तूं माझ्यासाठीं वेडी झालीस, माझ्यावर कौटुंबिक आपत्ति कोसळली !
**सरल**—( अशोककडे न पहातांच ) प्रेमाचा धिक्कार ! माझ्या निस्सीम प्रेमाचा धिक्कार ! चांडाळा, धिक्कार—धिक्कार असो तुला !
**अशोक**—( हुंदका देत ) धिक्कार—त्रिवार धिक्कार असो मला. सरल, मला क्षमा कर. मी तुझ्या पायां पडतों.
**सरल**—पायांवर दगड पाडून घेण्याची माझी इच्छा नाहीं.
**अशोक**—दगड ! खरोखरच दगडाहून कठोर मीं ! सरल, पहा ना ग एकदां माझ्याकडे ! तूं केव्हां ह्या वेडांतून मुक्त होशील ?
**सरल**—( अशोककडे न पहातांच ) माझे अशोक माझे होतील तेव्हां !
**अशोक**—मी तुझाच आहें सरल ! आजन्म तुझाच आहें !
**सरल**—काय ? तुम्ही माझे ? आणि मी कोणाची ?
**अशोक**—अर्थात् माझी ! मी तुझा नि तूं माझी !
**सरल**—( घाईघाईनें ) काय ?—मी तुमची ? नि तुम्ही माझे ? पण तुम्ही कोण ?—अशोक—( किंचाळून अशोकच्या अंगावर पडते. )
**अशोक**—अहाहा ! किती भाग्याचा मी ! ( तिला बांकावर बसवीत ) सरल, सावध हो. ( बाजूच्या कारंजांतून हातरुमाल भिजवून आणून तिच्या डोळ्यांना लावतो. ती त्याची नजर चुकवून हंसते. ) डोळे उघड ! पहा—ह्या वृक्षलतांच्या प्रेमलीला पहा ! किती गोड दृश्य हें !

पद

गमत प्यारा हा पसारा ॥
प्रेमें सुगंधित सारा ॥ ध्रु० ॥
कलिका हळु हळु हंसति मधुर ह्या ॥
बरसे जणुं अमृत-धारा ॥ १ ॥

**सरल**—(सावध झाल्यासारखें करून) मी कुठं आहे ?

**अशोक**—वेड्यांच्या हॉस्पिटलांत !

**सरल**—आणि तुम्ही ?

**अशोक**—मीहि वेड्यांच्या हॉस्पिटलांतच !

**सरल**—म्हणजे, आपण दोघेंहि वेडीं आहोंत कीं काय ?

**अशोक**—नाहीं तर काय ? आपण दोघेंहि वेडींच ! पण सरल, तूं आतां चांगली शुद्धीवर आलीस ना ?

**सरल**—पण अशोक, तुम्हीं चांगले शुद्धीवर आलां ना ?

**अशोक**—चांगलाच शुद्धीवर आलों. तुझ्या प्रेमाकडे डोळेझांक केली, पण आतां चक्क डोळे उघडले. किती मूर्ख मी !

**सरल**—जाऊं दे गडे तें. उगीच काय दोष लावून घ्यायचा स्वतःला ? पण अशोक, आतां तरी झाली ना माझ्या प्रेमाची खात्री ?

**अशोक**—खरं सांगूं का सरल, तुझ्या प्रेमाबद्दल मला पहिल्यापासूनच खात्री होती. पण सर्वसाधारणपणें स्त्रीजातीवर नि स्त्रीजातीच्या प्रेमावर माझा मुळीं विश्वासच नाहीं.

**सरल**—कां बरं असं ? पुरुषजातीच्या प्रेमावर तुमचा विश्वास असावा नि स्त्रीजातीच्या प्रेमावर कां नसावा ?

**अशोक**—कारण असं कीं, स्त्रियांचं प्रेम हें बाटलींत भरलेल्या स्पिरिट-सारखं असतं !

**सरल**—स्पिरिटसारखं ? तें कसं काय ? पेटबीट घेतं कीं काय कधीं ?

**अशोक**—छे छे-तें स्वतः पेटत नाहीं, दुसऱ्याला पेटवतं. आणि शिवाय बाटलींतलं स्पिरीट बूच घट्ट असेल तरच राहातं. पण जरा का बूच सैल बसलं, कीं तें उडून गेलंच म्हणून समजा ! फार खबरदारी घ्यावी लागते तें टिकवायला !

**सरल**—इश्य ! कांहीं तरी काय हो घाणेरडं बोलतां ?

**अशोक** — घाणेरडं ? यांत काय बोललों घाणेरडं ! स्पिरीट घाणेरडं, बाटली घाणेरडी कीं बूच घाणेरडं ? हें पहा सरल, पांच पंचांनीं जर तसं सांगितलं, तर यापुढं एक शब्दहि उच्चारणार नाहीं. तोंडाला एवढं मोठं कुलूप घालीन नि त्याची लांबलचक चावी त्या पंचांच्या हातांत देईन.

**सरल** — तें जाऊं दे गडे. पण तुम्ही कसे आलां ह्या वेड्यांच्या हॉस्पिटलांत ?

**अशोक** — तें सगळं सांगतों. चल, फिरतफिरतच बोलूं आपण. तुलाहि जरा बरं वाटेल.

**सरल** — चला –

[ दोघेंहि हातांत हात घालून फिरत फिरत जातात. सुरेश व अण्णासाहेब प्रवेश करतात. अण्णासाहेब हॉस्पिटलांत जाण्याच्या पोषाखांत असतात.

**अण्णा** — तूं म्हणजे असा आहेस – अगदीं ज्याचं नांव तें ! छे – छे ! तो भामटा या उपर माझ्या बंगल्यांत येतां कामा नये.

**सुरेश** -- पण अण्णा, ऐकून तरी घ्या मी काय सांगतों तें.

**अण्णा** — तूं आतां कांहीं सांगूं नकोस. मला सगळं समजतं. तो सलकड्यांचा जोड गेला असता तर कोण भरून देणार होता ? तुझा बाप ? अरे बाबा, ज्यानं पै पै जमवून संसार केलेला असतो, त्यालाच कळेल पैशाची किंमत ! तुला काय ? तूं आपला आयत्या बिळांतला नागोबा ! बापकमाईचं सोडून आपकमाईचं खाशील, तेव्हां समजेल तुला – पैसा म्हणजे काय चीज आहे ती ! बरं !

**सुरेश** — पण अण्णा, तो माझा मित्र आहे; तेव्हां —

**अण्णा** — अस्सं ! तो चोर तुझा मित्र काय ? तरच ! अरे सुरेश, असल्या मित्रांच्या नादाला लागून तूं बिघडलास बरं ! अरे संगत तरी चांगली धरायची होतीस ! असल्या सलकडीचोर मित्रांची संगत काय धरतोस ? अरे मी होतों म्हणून सोडला त्याला. नाहींतर सलकडीं चोरल्याबद्दल चांगली हातकडी घातली असती हातांत ! आहेस कुठं ! माझा राग असा आहे कीं अगदीं ज्याचं नांव तें !

**सुरेश** — तुमचा राग नाकावर आहे, म्हणूनच मी तुमची क्षमा मागतों त्याच्या वतीनं.

**अण्णा** — कां रे – कां मागतोस क्षमा असल्या चोराच्या वतीनं !

**सुरेश** — कारण अण्णा – तोहि वेडाच आहे !

**अण्णा** — वेडा ? दिसतो तर चांगला शहाण्यासारखा !

**सुरेश** — ( हंसत ) हें खरं. कारण पुष्कळ लोक दिसतात शहाण्यासारखे नि असतात वेड्यासारखे !

**अण्णा** — पण कायरे सुरेश, काय झालं त्याचं डोकं फिरायला ?

**सुरेश** — कारण काय असणार ? दारूबंदी !

**अण्णा** — दारूबंदी ! दारूबंदीमुळं का त्याचं डोकं फिरलं ? अस्सं. पण आतां दारूबंदी उठली आहे. आतां येईल त्याचं डोकं ठिकाणावर !

**सुरेश** — छे छे ! आतां तर मुळींच आशा नाहीं ! दारुबंदीमुळं अक्कलमंदी आलेल्या लोकांना आतांच तर अधिक जपलं पाहिजे. माझ्या ह्या मित्राचं डोकं ठिकाणावर येईल असं वाटत नाहीं मला.

**अण्णा** — कां बरं ?

**सुरेश** — म्हणजे असं अण्णा, पूर्वीं दारू प्यायला मिळत नव्हती म्हणून डोकं ठिकाणावर नव्हतं; आणि आतां भिकार पिऊन डोकं ठिकाणावर नसायचं.

**अण्णा** — मिळून काय ? दारुड्याचं डोकं हें असं असतं कीं अगदीं ज्याचं नांव तें ! तेव्हां काय ? वेडा आहे तर तो ? ( सुरेश होकारार्थी मान हालवतो. ) तरी मी विचार करीत होतों, त्यानं एकदम माझी सलकडीं कशीं लांबवलीं ? मग काय रे सुरेश, त्याला मी ठेवतों वेड्यांच्या हॉस्पिटलांत.

**सुरेश** — ( घाबरून ) छे छे ! कशाला उगीच ब्याद पाहिजे आपल्याला ! आलाय आपला मला भेटायला म्हणून, राहील एक दिवस नि जाईल !

**अण्णा** — तूं म्हणजे असा आहेस — अगदीं ज्याचं नांव तें ! अरे तुझा मित्र म्हणवतोस,नि कशी रे दया नाहीं तुझ्या मनाला ! असला एक तरुण फुकट जाणं बरं नव्हे. मी त्याला ठेवतों वेड्यांच्या हॉस्पिटलांत.

**सुरेश** — ( घाबरून ) अण्णा, नका ठेवूं त्याला वेड्यांच्या हॉस्पिटलांत.

**अण्णा** — तें कांहीं नाहीं. मी ठेवणार !

**सुरेश** — पण निदान आजचा दिवस तरी त्याला नका ठेवूं !

**अण्णा** — हां !— तसं करूं पाहिजे तर. पण काय रे, कुठं गेलाय तो आतां ?

[ इतक्यांत मागच्या बाजूनें अशोक व सरल इकडेतिकडे बघत बघत फिरत फिरत येत असतात. सुरेश त्यांना मागच्या मागें जाण्याची खूण अण्णांच्या नकळत करतो, पण त्यांचं लक्ष नसतं. अण्णांचें लक्ष सुरेशच्या खुणांवरून तिकडे जातें. अशोक व सरलचेंहि लक्ष अण्णा व सुरेश यांच्याकडे जातें.

अशोक मागच्या मागें पळून जातो व सरल दुसऱ्या बाजूला पळण्याचा प्रयत्न करते.

**अण्णा**—( सरलला ) अग ये—सरल ! सरल !! ( सरल थांबते ) अग तिकडे कुठं पळतेस ? चल ये आधीं इकडे. ( सरल येऊन मान खालीं घालून उभी राहाते. ) काय ग—काय करीत होतीस त्या वेड्याबरोबर तिकडे एका बाजूला ? घडधडीत नवऱ्यादेखत असले चाळे करायला शरम कशी वाटत नाहीं तुला ? कळवूं का तुझे हे थेर तुझ्या आबासाहेबांना ? चांगलं चालवशील सासऱ्याचं नांव बरं सूनबाई ! मूर्ख कुठली ! ( सुरेशला ) आणि कायरे ये बावळटा, अरे अगदींच कसा तूं एखाद्या नटीच्या नवऱ्यासारखा मांगळू झालास ? अरे तुझी बायको दुसऱ्याबरोबर गेलेली उघड्या डोळ्यांनीं पहातोस ?

**सुरेश**—तुम्हींच पाहिलंत ना आतां ? झाली ना तुमची खात्री ? अण्णा, मी साफ सांगतों, मला ही बायको नको. नवयुग चित्रपट लिमिटेडच्या ट्रेडमार्कमधल्या पंखवाल्या बाईशीं मी लग्न लावीन, पण ह्या बिनपंखाच्या पांखराबरोबर लग्न करणार नाहीं ! बिचारी ती पंखवाली बाई, एका चांदणीच्या मागं लागली आहे. पण हीं बिनपंखाचीं पाखरं, कधीं कुणाच्या मागं लागतील, याचा नेमच नाहीं.

। सरल रागानें बघते. तो तिला खुणा करतो.

**अण्णा**—अरे सुरेश, लग्न व्हायचं आतां काय बाकी राहिलं आहे ? काय ग सरल, अग अशी मान खालीं घालून काय उभी राहिलीस नवरीसारखी ? सुरेश, अरे मी रागावलों म्हणून तूं रागावून कसं चालेल ? तूं नवरा–मी सासरा ! पहा बरं किती गरीब आहे ती !

**सुरेल**—( रागानें ) गरीब ? ही गरीब ? होय तर ! इतकी गरीब कीं जशी कांहीं महात्मा गांधींची शेळीच !

**अण्णा**—पण तुला खाटकाला कांहीं आहे का दयामाया ?

**सरल**—( लटकें रडें आणून ) पहा हो अण्णा तुम्हींच ! काय चूक झाली माझ्या हातून ? जेव्हां जेव्हां असं सांगायचं होतं—' ही बायकोच नको–ही बायकोच नको ! ' माझ्या प्रेमाची किंमत तरी आहे का यांना ? शेळी मरते जिवानिशीं नि खाणार म्हणतो वातड ! ( रडण्याचा आविर्भाव करते. हुंदके देते. पण पदर आड धरून सुरेशशीं हंसते. )

**अण्णा**—उगी–उगी–उगी ! सुरेश, म्हण एकदां 'करीन तुझ्याशीं लग्न' म्हणून !

**सुरेश**—प्राण गेला तरी म्हणणार नाहीं तसं. आत्महत्त्या करीन, पण लग्न करणार नाहीं.

**अण्णा**—(रागानें) काय म्हणालास ? हिच्याशीं लग्न करणार नाहीं ?

**सुरेश**—हो !–हिच्याशीं लग्न करणार–नाहीं—!

**अण्णा**—(अधिक चढत्या आवाजांत) केलें पाहिजे !

**सुरेश**—(तितक्याच जोरानें) नाहीं करणार !

**अण्णा**—(रागाच्या अतिरेकानें) अरे तूं नाहीं तुझा बाप हिच्याशीं लग्न करील, समजलास ?

**सुरेश**—(हंसत) मग काय सुंठीवांचून खोकला गेला म्हणायचा ! (अण्णांच्या लक्षांत आपली चूक येते व ते नरम पडतात.)

**अण्णा**—(हलक्या आवाजांत) रागाच्या भरांत माझं हें असं होतं.

**सरल**—(सुरेशला खुणावल्यावर) अण्णा, तुम्ही आपले दहा मोजा तुम्ही.

**अण्णा**—(शांतपणें) एक–दोन–तीन–चार–पांच–सहा–सात–आठ–नऊ–दहा ! हं–बोल आतां. करणार ना हिच्याशीं लग्न ?

**सरल**—हें पहा, मी तुमचे पाय धरतें–मला क्षमा करा ! (सुरेशचे पाय धरते.)

**अण्णा**—(मोठ्यानं हंसून) अग हें भलतंच काय धरतेस ? (सरल उठून उभी राहते.) पोरी जागा चुकलीस बरं ! अग बायकांनीं पुरुषांची मनधरणी करायची असते, पायधरणी नव्हे. मन पायांच्या वर असतं. समजलीस ?

**सरल**—पण अण्णा, बायकांचं मन ह्या पुरुषांच्या पायांखालींच तुडवलं जातं, म्हणून स्त्रिया पुरुषांची मनधरणी न करतां मुद्दाम पायधरणीच करतात.

**अण्णा**—झालं ! तुम्हीं कांहीं बोलायच्या बाबतींत हार जाणार नाहीं कुणाला ! तुमचीं तोंडं म्हणजे अशीं आहेत—कीं ज्याचं नांव तें ! घर बाई–काय वाटेल तें धर ! माझं काय जातंय त्यांत ? पण काय ग, त्याला भलतंच काय करायला सांगतेस ?

**सरल**—भलतंच काय करायला सांगितलं मीं ?

**अण्णा**—वाः ! काय म्हणजे ? क्षमा करायला नाहीं का सांगितलीस त्याला ?

**सरल**—मग ? त्यांत काय चुकलं ?

**अण्णा** — काय चुकलं ? ( हंसतो. ) अग प्रेम करायला सांग – लग्न करायला सांग. वेड्यासारखी क्षमा करायला काय सांगतेस त्याला ? क्षमा केल्यानं काम भागतंय का तुझं ? काय करायला हवं, तें करायला सांग ! भलतं सलतं काय सांगतेस त्याला ?

**सुरेश** — पहा – अण्णा, आतां तुम्हीच पहा !

**सरल** — अण्णा, तुमचं आपलं कांहीं तरीच !

**अण्णा** — माझं कांहीं तरी कसं ? अग हा नवरा ना तुझा ? ( सरल मानेनें होय म्हणते ) मग ? समज त्यानें क्षमा केली, नि प्रेम केलं नाहीं, तर ? वेडी कुठली ! तुम्ही हल्लींच्या पोरीच अशा कीं — अगदीं ज्याचं नांव तें ! भलत्याला भलतंच करायला सांगतां ! तरी मीं म्हटलं, हा कारटा तुला सोडून त्या सुधेच्या मागं पिंगा कां घालतो ! तूं जर त्याला सगळं सोडून क्षमाच करायला सांगायला लागलीस, तर तो तरी बिचारा सुधेच्या तोंडाकडे पाहील नाहीं तर काय करील ?

**सुरेश** — आतां कसं बोललां ?

**अण्णा** — ( काठी उगारून ) तूं – तूं – बोलूं नकोस ! ( सरलला ) अग क्षमा करायला सांगायची माझ्यासारख्या म्हाताऱ्या माणसाला ! आमचं कामच आहे आतां तें ! आम्ही दुसरं काय करणार ?

**सरल** — पण माझी चूक झाली नाहीं का अण्णा ?

**अण्णा** — नाहीं. — ती चूक तुझी नाहीं — ह्या शहाण्याच्या कांद्याची !

**सुरेश** — काय ? माझी चूक ?

**अण्णा** — हो – हो तुझी चूक !

**अण्णा** — बायकोला कशी सांभाळावी हेंच ह्याला कळत नाहीं अजून. आणि ( वेडावून ) मी कॉलेजांत जातों ! माझं कॉलेज असतं तर, सध्यांचा एखादा विषय कमी केला असता, नि त्या ऐवजीं 'बायकोला कशी सांभाळावी' हें शिकवायला लावलं असतं; सोडलं नसतं. तूं इतका शिकलास, पण फुकट ! बायको कांहीं सांभाळतां येत नाहीं तुला !

**सुरेश** — आणखी कशी सांभाळायची बुवा !

**अण्णा** — कशी म्हणजे ? अरे आधींच हिचा स्वभाव इतका अल्लड ( सुरेशकडे पाहून सरल हंसते ) कीं अगदीं ज्याचं नांव तें ! मग आपल्या अळवाची खाज आपल्याला नको का कळायला ?

**सुरेश** —आतां मला काय माहीत कीं हें आपलं आळूं इतकं—हें असेल म्हणून !

**अण्णा** —आतां तरी कळलं ना ? मग चला आतां तिकडे बंगल्यांत जाऊन बसा. चल रे ये लडदू, चल तिला घेऊन माझ्या समक्ष. चला, मीच येतों तुम्हांला तिथपर्यंत पोंचवायला. मग मी जाईन सावकाश वेड्यांच्या हॉस्पिटलांत.

[ तिघेही जातात—अशोक फिरत फिरत प्रवेश करतो.

**अशोक** —आज कांहींतरी वेडा म्हातारा चवताळलेला दिसतो. स्वारी भडकली असेल बहुधा. नाहीं तर उगीच अण्णासाहेबांनीं मला मागच्यामागें पळायला सांगितलें नसतें. सरललासुद्धां अण्णासाहेबांनींच ठेवली कीं काय आपल्या ताब्यांत ?

[ इतक्यांत अण्णासाहेब येतात; अशोक आणि अण्णासाहेब सहानुभूतिपूर्वक एकमेकांकडे पहातात.

**अण्णा** —काय बिचाऱ्याची स्थिति ! ( सुस्कारा सोडतो ) आयुष्याचं मातेरं झालं बिचाऱ्याच्या !

**अशोक** —( लांबूनच ) बिचारा वेडा म्हातारा ! ( जवळ जाऊन ) काय हो आजोबा ! कुठून आणला हा ऐटबाज पोषाख ! अण्णासाहेबांच्या सलकड्यांप्रमाणें हा पोषाखहि नाहीं ना कुणाचा लांबवला ? वेडा बिचारा ! ( हंसतो. )

**अण्णा** —वेडा बिचारा ! स्वतःचं डोकं फिरलं असतांना मलाच वेडा म्हणतो आहे ! अरे अरे अरे अरे ! बाबा, कशाला त्या दारूच्या फंदांत पडलास !

**अशोक** —दारूच्या फंदांत पडलास ! ( हंसून ) बिचाऱ्याचा कोणीतरी ( दारू पिण्याची खूण करून ) तळिराम केलेला दिसतोय आज. काय हो शहाणे आजोबा, कोणी पाजली दारू तुम्हांला ?

**अण्णा** —( हंसत ) तूं ! काय मूर्ख ! अरे वेड्या, दारूबंदी उठली, तरी सुद्धां तुझं डोकं ठिकाणावर आलं नाहीं ना !

**अशोक** —माझं डोकं ठिकाणावर नाहीं ? वेडबीड लागलंय कीं काय तुला ! हो ! पण वेड्यालाच काय विचारतोंय मी हें ?

**अण्णा** —म्हण–म्हण वेडा मला. मला नाहीं बरं राग यायचा ! वेड्याचं बोलणं कोण मनावर घेईल ?

**अशोक** —ये वेड्या, आतां कुठं चाललास ?

**अण्णा** —काय सांगणार तुला वेड्याला ?

**अशोक** —( हंसून ) तूं वेडाच मला वेडा म्हणतो आहेस, तेव्हां त्याचा राग कसला ! नाहीं तर—

**अण्णा**—वारे बाटलाबाईचे प्राणनाथ ! वेडा तो वेडा नि शहाण्याचा आव आणतोय लेकाचा ! वेडा कुठला !

**अशोक**—अरे थेरड्या, तूं वेडा !

**अण्णा**—अरे बेरडा, तूं वेडा !

**अशोक**—तूं वेडा ! ( हंसतो )

**अण्णा**—तूं वेडा ! ( हंसतो )

[ दोघेहि हंसतात. इतक्यांत साळू खलबत्ता घेऊन बागेंतून जात असते, तिला अण्णासाहेब हांक मारून जवळ बोलावतात नि अशोककडे पहात पहात 'चल तिकडे तुला काय ते सांगतों !' असं म्हणून घेऊन जातात.

**अशोक**—( अण्णासाहेब गेलेल्या दिशेकडे पहात ) अरेच्चा ! हा वेडा त्या वेडीला घेऊन तिकडे कुठं चालला ? म्हातारा मोठा रंगेल आहे खरा ! ( थोडासा विचार केल्यासारखें करून ) छे–काय बरं असावा हा प्रकार ? म्हातारा दिसतो सरळ. ती बाईहि बिचारी सालस दिसते. काय भानगड आहे, परमेश्वर जाणे ! हीं सगळीं माणसं मला बनवीत तर नसतील ना ?

[ इतक्यांत शिवा प्रवेश करतो.

**शिवा**—काय हो पावने, तुमी इथं माझी मागारीन पायलीत काय ?

**अशोक**—तुझी मागारीन ? कसलीशी आहे तुझी मागारीन ? ( हंसत ) म्हणे मागारीन !

**शिवा**—तिच्या हातांत खलबत्ता होता बगा.

**अशोक**—हां–हां ! ती वेडी होय ?

**शिवा**—वेडी ? साला हाय काय नि नाय काय ?

**अशोक**—आतां इथून गेली खरी ती. पण काय रे, ती तुझी मागारीन होय ?

**शिवा**—व्हय. ती माजी मागारीन नि मी तिचा मागारी !

**अशोक**—( हंसत ) तुझं डोकं फिरलं होतं, हें जर अण्णासाहेबांनीं मला अगोदर सांगितलं नसतं, तर मी तुझ्या शब्दावर विश्वास ठेवून, ती वेडी तुझी मागारीण आहे, असंच समजलों असतों.

**शिवा**—साला हाय काय निं नाय काय ? माजं डोकं फिरलं होतं ? आनि थोरल्या शेटनीं सांगितलं ? साला हाय काय नि नाय काय ? माजी साळू बी वेडी ? अरे काय डोचकं फिरलं कीं काय तुजं ?

**अशोक** — ( स्वगत ) कांहीं तरी पाणी मुरतं आहे खास ! ( उघड ) काय रे, ते म्हातारे गृहस्थ, लांब कोट घालतात ते – ते कोण ?

**शिवा** — साला हाय काय नि नाय काय ! अजून ठावं नाय ? मला येल नाय आतां. मला साळूला बगाया जाया हवं.

**अशोक** — मी सांगतों ना ती कुठं गेलीय ती ! पण सांग तर आधीं ते कोण ते !

**शिवा** — अओ पावने, खरं सांगू का तुमाला, ते आमचे थोरले शेट. ह्या बंगल्याचे नि ह्या बगिच्याचे मालक !

**अशोक** — ह्या बंगल्याचे मालक ? आणि हें वेड्यांचं हॉस्पिटल नव्हे वाटतं ?

**शिवा** — अवो पावने, त्या आमच्या धाकट्या शेटचं ऐकाया, तुमाला बी येड लागलं कीं काय ? अओ, हा बंगला म्हायाचा आणि तें — बगा येड्याचं इस्पिताल ! दिसलं ?

**अशोक** — दिसलं. ( स्वगत ) अरे चोरा ! असं काय ? ठीक आहे.

**शिवा** — आतां सांगा बरं मला माझी साळू कुठं गेलीय ती.

**अशोक** — तुझ्या साळूला तुझ्या थोरल्या शेटनीं तिकडे बाजूला नेलीय.

**शिवा** — आँ ! बाजूला नेलीय ? साला हाय काय नि नाय काय ? खरंच सांगतां ?

**अशोक** — मी कशाला खोटं सांगेन ?

**शिवा** — पण काय हो पावने, कशी नेली त्यांनीं बाजूला ?

**अशोक** — कशी म्हणजे ? खुणेनं बोलावून नेली !

**शिवा** — खुनवून नेली काय ? ( थोड्याशा रागानें ) साला हाय काय नि नाय काय ? पन पावने, कसली खून केली ? डोला मारला काय ?

**अशोक** — तें कांहीं दिसलं नाहीं मला. पण बहुतेक डोळाच मारला असेल.

**शिवा** — अहो बहुतेक काय ? खात्रीनं डोलाच मारला असल. नाय तर हा म्हातारा दुसरं काय मारनार ? त्यानं डोलाच मारला असल. साला हाय काय नि नाय काय !

**अशोक** — ( मुद्दाम त्याला चिडविण्यासाठीं ) ती तुझी बायको काय ? मग असं कसं बुवा ?

**शिवा** — अहो पावने, तें तसंच हाय. मलाबी संशय होताच. माज्या साळूला ह्या म्हाताऱ्यानं आंतल्या कामाला ठेवली, तवांच संशय आला मला. साला हाय काय नि नाय काय ?

**अशोक** — काय म्हणालास? तुझ्या बायकोला आंतल्या कामाला ठेवलीय? आंतल्या कामाला कशाला?

**शिवा** — साला हाय काय नि नाय काय! अहो पावने, बारक्यासारक्या कामाला सुद्धा शिरमंतांना नोकर लागतात, हें पालन्यांतलं पोरबी सांगल. अहो, हे शिरमंत मोटारीचं चाक धरून मोठ्या ऐटींत बसनार, पन हंडल मारून मोटार चालू कराया यांना डरायवर लागतो. यांनीं फक्त बसून चाक पकडायचं नि फुगा दाबून पॅंक–पॅंक, पॅंक–पॅंक करायचं! काचकन् हंडल मारायची काय ताकद नाय यांना! साला हाय काय नि नाय काय!

**अशोक** — खरं आहे तुझं म्हणणं.

**शिवा** — पण काय हो पावने, कुटल्या बाजूला नेली माज्या सालूला?

**अशोक** — तो पहा – तो लतामंडप आहे ना, त्याच्या बाजूला.

**शिवा** — बसलीं होतीं कां उभीं होतीं?

**अशोक** — छे – छे–बसलीं नव्हतीं. उभ्या उभ्याच कांहीतरी चाललं होतं त्यांचं!

**शिवा** — साला हाय काय नि नाय काय? अग्ग सालू!

[ रागारागानें तिला शोधायला जातो. दुसऱ्या बाजूनें सुधा येते. तिला पाहून.

**अशोक** — ही कोण येतेय फणफणत? ठीक आहे.

**सुधा** — ( नखऱ्यानें ) सुरेश, अहो सुरेश!

**अशोक** — अहो तुमचं नांव काय?

**सुधा** — माझं नांव सुधा.

**अशोक** — मग तुम्ही त्या सुरेशनां शोधतां आहां ना?

**सुधा** — होय. केव्हांपासून त्यांना शोधते आहे, पण कुठेंच पत्ता नाहीं त्यांचा.

**अशोक** — ( हंसत ) कसा लागेल पत्ता? अहो ते एका मोठ्या कामांत गुंतले आहेत. सरलनं सगळं सांगितलं मला.

**सुधा** — असं कां?

**अशोक** — होय. आतां सुरेशनं एक नवीनच युक्ति काढलीय.

**सुधा** — कोणती ती युक्ति?

**अशोक** — मला सांगितलं आहे कीं, सुधा आली कीं तिला वेडी बनायला सांगा.

**सुधा** — ( ओरडून ) वेडी!

**अशोक** — थांबा किंचाळूं नका अशा आधींच. मग तसंच किंचाळायचं आहे. तुम्हीं वेड्या बनायचं.

सुधा — आणि मग ?
अशोक — आणि मग माझी बायको बनायचं !
सुधा — इश्श ! तुमची बायको !
अशोक — अहो खरी बायको नव्हे.
सुधा — तर ?
अशोक — बनावट बायको ?
सुधा — बनावट बायको, तर मग काय हरकत नाहीं.
अशोक — वास्तविक काय आवश्यकताच नव्हती. पण, केवळ सुरेशनं सांगितलं आहे म्हणून ! अण्णासाहेबांना सोंग करून दाखवयाचं आहे म्हणे.
सुधा — सोंग करून दाखवायचं ? कुणी कुणी ?
अशोक — तुम्ही नि मी ! तेव्हां आतां व्हा बरं वेड्या ! पाहूं या कशा दिसतां त्या !

[ सुधा वेड्यासारखे हावभाव करून नजर फिरवूं लागते.

अशोक — वाः वाः ! बस्स ! छान दिसतं सोंग. अगदीं डिट्टो वेडी !
सुधा — आणखी काय करायचं तें सांगा हं मला – मला बाई नाहीं साधत बोलायला बिलायला !
अशोक — ते सगळं मी शिकवतों. कांहीं काळजी करूं नका !
सुधा — हो – पण मी वेडी आणि तुम्ही कोण बनणार ? वेड्यांच्या हॉस्पिटलचे मालक ?
अशोक — छे छे ! वेडा !
सुधा — अय्या ! वेडे !
अशोक — हो ! मी वेडा नि तूं वेडी ! हं. चला आतां करा सुरवात.
सुधा — कसली सुरवात करूं ?
अशोक — बोलायला सुरवात करा !
सुधा — पण सांगा ना काय बोलूं तें.
अशोक — सांगायचं काय त्यांत ? तुम्ही बोलतां ना, तें वेड्यासारखंच बोलतां. छान बोलतां. यापेक्षां आणखी कसं बोलणार ! बोला, काय सुचेल तें बोला. वाटेल तें गाणं म्हणा.
सुधा — ( वेडी बनून ) सुरेश— सुरेश —

**अशोक**—अंह ! आतां सुरेश नाहीं म्हणायचं. अशोक–अशोक म्हणायचं. माझं नांव घ्यायचं.

**सुधा**—असं होय ? बरं तसं ! अशोक—अशोक !

**माझ्या मामाच्या घरीं । मामीचें बघ राज्य रे ॥**
**माझ्या मामाच्या घरीं ॥**

पण अशोक, याच्या पुढचं नाहीं येत– आतां ?

**अशोक**—हें पहा, थांबूं नका अशा. मी सांगेन तेव्हां थांबायचं. त्यालाच जोडून दुसरं गाणं म्हणा—

**सुधा**—( गाणं म्हणते )

पद

**गेलें वेडि बनून । सखया**
**आठव तुमची घडि घडि येते ।**
**भेटीसाठीं मन तळमळतें ।**
**प्रितीचें हें नाजुक नातें ।**
**जाउं नका विसरून ॥ १ ॥**

**अशोक**—झालं ? आतां तुम्ही तिथं रहा. मी तुमची आतां प्रेमयाचना करीन ! तुम्ही माझ्याजवळ यायचं ! हं ? मग परत मी तुमचा धिक्कार करीन.

**सुधा**—तेव्हां मीं काय करायचं ?

**अशोक**—रडायचं ! आणि तुम्ही माझी प्रेमयाचना करायची ! चला रहा तिथं. प्रथम मी करतों प्रेमयाचना ! [ सुधा वेड्यासारखे डोळे करीत रहाते. अशोक बोलतां बोलतां तिच्या नकळत हंसतो. ] हे वेडपट पोरी, माझ्यावर प्रेम कर ! मीं तुला वेडी बनविली, तशी तूंहि तुझ्या प्रेमानें मला वेडा कर. हे बेअकली बायको, माझी तुला दया येत नाहीं काय ? तुझ्या डोक्यांत मुळींच भेजा नाहीं काय ? ( हंसतो )

**सुधा**—( वेड्यासारखी नजर फिरवीतच ) अहो, मी आतां काय बोलूं ?

**अशोक**—जरा थांबा. अजून संपलं नाहीं माझं.

**सुधा**—आटपा काय तें लौकर.

**अशोक**—( उठून ) बरं आतां तुम्हीच करा माझी प्रेमयाचना. नाहीं—नाहीं. जरा थांबा – मी एक इंग्रजी गाणं म्हणतों—

आय लव्ह यू—!
यू आर माय स्वीट-हार्ट
यू आर माय स्वीट-मीट-मार्ट
यू आर माय हाफ् पार्ट
आय लव्ह यू—!!

हं आतां चालू द्या तुमचं—

**सुधा**—सख्या हरी !

**अशोक**—सखे सजणे !

**सुधा**—माझ्या गुलाबाच्या फुला, – मला दे ना रे तुझा सुवास !

**अशोक**—माझा सुवास हवा असेल, त्याला कांटा बोचेल.

**सुधा**—चालेल-बोचूं दे कांटा. पण तुझा सुवास हवा.

**अशोक**—(एकदम तिच्या अंगावर खेंकसून) धिक्कार धिक्कार असल्या गुलाब-वेड्या वेडीला ! (चांगल्यापणें) पाहिलंत ? आतां मीं तुमचा धिक्कार केला. आतां तुम्ही शोक करा.

**सुधा**—बरं. (वेड्यासारखी करूं लागते) अशोक, अशोक, पुढच्या जन्मीं तरी व्हाल ना हो माझे ?

**अशोक**—नाहीं. पुढचा जन्म घेतांना मी ब्रह्मदेवाला सांगेन, कीं हे ब्रह्मदेवा, पुढच्या जन्मीं मला रामा कर, शोफर कर, बबर्जी कर; आणि हे ब्रह्मदेवा, हे सर्व जन्म जर आधींच रिझर्व्ह झाले असतील, तर शेवटीं गवळ्याचा रेडा कर.

**सुधा**—(चांगल्यापणें) आतां मी काय म्हणायचं ?

[इतक्यांत शिवा साळूच्या हाताला धरून ओढीत येतो. अशोक त्यांना पाहून घाबरतो.

**अशोक**—आतां कांहीं म्हणूं नकोस. चल तिकडेच सांगतों.

**शिवा**—[सुधा अशोककडे पाहून] अरेच्चा ! साला हाय काय नि काय ? सुधाताई त्या पावन्याबरोबर तिकडं कुटं चालली ? साला हाय काय नि काय ? काय ग साळू, तिथं काय चाललं होतं बोल.

**साळू**—काय चाललं होतं म्हनजे ? मी आपली कुटीत होतांव.

**शिवा**—अग वा ग साळू ! मला बनवतेस होय ? थोरल्या शेटसंगं तिथं काय करीत होतीस ! अँ.

**साळू** — बाय बाय बाय बाय! हांव तरी कोन तुमी? एकसारका संशय-संशय-संशय! काय बाय तरी! थोरल्या शेटचाबी संशय? थोरले शेट म्हनजे सत्पुरुस हायत बापडे!

**शिवा** — सत्पुरुस काय? साला हाय काय नि नाय काय? शिरमंताच्या बायका सत्पुरुशाच्या मागं लागतात, म्हनून तूं बी सत्पुरुशाच्या मागं लागाया लागलीस व्हय!

**साळू** — कुनी मेल्यानं तुमाला सांगितलं हें खोटंनाटं?

**शिवा** — कुनी म्हनजे? त्या पावन्यानं!

**साळू** — कुठं गेला तो मेला पावना? जळ्ळं मेल्याचं त्तोंड तें – मिळाला असता तर सुक्या बोंबलासारखा भाजून खाल्ला असता मेल्याला!

**शिवा** — अग पन साळू, इतकं काय ग गुपित सांगत होते थोरले शेट?

**साळू** — ते मस म्हनाले, त्या पावन्यांचं डोचकं फिरलंय. तवां त्याच्या आजूबाजूस फिरूं नको. न जानो, कालयेल सांगून येतोय?

**शिवा** — अगदीं बराबर! त्याचं डोचकं फिरलंच असावं. अग साळू, मी बी साला किती अडानी? उगीच संशय घेतला तुजा नि थोरल्या शेटचा! अग त्या येड्यानं काय तरी सांगितलं मला. पावना येडाच हाय. अगदीं खातर झाली माझी. साला हाय काय नि नाय काय? चल बरं तूं तिकडे बंगल्यांत. नायतर तो येडा यायचा हितं? पळ. (साळू जाते. त्याच बाजूनें सुरेश प्रवेश करतो.)

**सुरेश** — शिवा तुला सुधा दिसली होती कां रे? केव्हांपासून तिचा पत्ताच नाहीं. कुठं गेली कुणास ठाऊक!

**शिवा** — शेट, सुधाताई कुठं गेली ती मस ठावं हाय! साला हाय काय नि नाय काय?

**सुरेश** — कुठं गेली?

**शिवा** — त्या तुमच्या येड्या पावन्यासंगं तिकडं गेलीया.

**सुरेश** — छट्! वेड लागलंय तुला!

**शिवा** — अहो शेट, खोटं नाय सांगत, तर खरं सांगतांव! त्या येड्यासंगं त्याबी येड्या झाल्यात!

**सुरेश** — अस्सं? अरे भामट्या कादंबरीकारा! तूं असा सूड उगवलास काय माझ्यावर? पण ह्या सुधेला अगदींच कशी अक्कल नाहीं? बायकांना सांभाळायचं मोठं कठीण काम आहे बुवा.

**शिवा**—अगदीं खरं बोललांव शेट ! वाऱ्यासारखी पळनारी मोटारबी ताब्यांत ऱ्हाती, पन हळु चालनारी बायको नाय आवरत ! बिरेक दाबला कीं मोटार ऱ्हायलीच उबी! पन ह्यांना कोनी कितीबी दाबन्याचा यत्न केला, तरी फुकट. कुनाच्याबी दाबांत ऱ्हात नसतात ह्या बायका !

**सुरेश**—अरे तेंच कां ? पोलिसानं हात दाखवला तर मोटर बिचारी थांबते तरी ! पन ह्या बायका पोलिसालाच हात दाखवून मोकळया व्हायच्या ! पुरुष बिचारा फसतो ह्या बायकांच्या प्रेमांत सांपडून ! प्रेम करतांना दसरा दिवाळी, नि लग्न झाल्यावर शिमगा होळी ! धांवत्या आगगाडीखालीं सांपडण बरं, पण बायकांच्या प्रेमांत सांपडणं नको. बायको घरांत आणणं, म्हणजे नुसती अडगळ घरांत आणणं आहे !

**शिवा**—( हंसून ) साला हाय काय नि काय ?

**सुरेश**—घडीची खुर्ची मिळते. घडीचं टेबल मिळतं. तशी जर शिवा, घडीची बायको मिळाली असती, तर मौज झाली असती ! सांभाळणं सोपं झालं असतं. ( जातां जातां ) कुठें गेली ती ? ( इकडे तिकडे पहातो. )

**शिवा**—( रागानें सुरेशकडे पहात ) ऑं ! माझ्या गरिबाच्या–म्हाताऱ्याच्या एकुलत्या एक बायकोवर तुजा डोला काय? म्हने, गड्याची बायको मिळाली असती तर काय मौज झाली असती ! साला हाय काय नि नाय काय ? अरे वारे धाकला शेट ! साला हाय काय नि नाय काय ! ( जातो. )

**सुरेश**—सुधा—!

**सुधा**—( आंतून ) सुरेश !

**सुरेश**—सुधा—!

**सुधा**—( प्रवेश करून )

**सुरेश**—( रागानें ) सुधा—

**सुधा**—काय झालं एवढं रागानं अंगावर यायला ? पहा तर कशी वेडी बनते ती ! मघांपासून सारखी प्रॅक्टिस करतेंय मी तिकडे बसून. पहा हं ! ( वेड्यासासारखी करूं लागते. सुरेश आश्चर्यचकित होतो. ) अशोक— अशोक—

**सुरेश**—खरोखरच हिला वेड लागलं कीं काय ?

**सुधा**—तुम्ही माझे ना ? मी तुमची ना ? **माझ्या मामाच्या घरीं। मामीचें बघ राज्य रे। माझ्या मामाच्या घरीं ॥** ( गाते—वेड्यासारखी नाचते. ) साधेल ना मला वेडीचं काम ? असं काय हो ? बोला ना ?

**सुरेश**—अग असं झालंय तरी काय तुला ? कसलं वेडीचं काम आणि काय आहे हा प्रकार ?

**सुधा**—वा ! थट्टा करतां होय माझी ? तुम्हींच तर मला वेडीचं काम शिकवायला सांगितलंत अशोकनां ! खरंच, मी आणि अशोक आतां वेड्यासारखं करून अण्णांना भंडावून सोडणार ! तुम्ही अगदीं निर्धास्त रहा.

**सुरेश**—म्हणजे ? अण्णांना भंडावून सोडण्यासाठीं चालवलंत कीं काय हें सगळं ? ( ती होकारार्थी मान हालवते. ) अग काय डोकींबिकीं फिरलीं कीं काय तुमचीं ?

**सुधा**—हें हो काय असं ? तुम्हीच तसं सांगतां, आणि तुम्हीच दोष देतां ?

**सुरेश**—अग वेडे, मीं नाहीं तसं सांगितलं; त्या अशोकनंच बनवलं तुला !

**सुधा**—अय्या ! शेवटीं असंच का हें ? मेल्यानं मला आपली बनावट बायकोसुद्धां बनवली !

**सुरेश**—हो का ? छान केलं !

**सुधा**—( रागानें ) तुमच्यामुळं झालं सगळं हें !

**सुरेश**—तें कसं काय ? काय केलं मीं ?

**सुधा**—काय म्हणजे ? त्यांच्या बायकोला तुम्हीं बनावट बायको केलींत, तुमच्या बायकोला त्यांनीं बनावट केली ! सारी फिटांफिट झाला. पण मी म्हणतें जरा बसायचं इथं ह्या बागेंत माझ्याबरोबर ? ( त्याचा हात धरून त्याला बांका-वर बसवून आपणहि बसते. )

**सुरेश**—काय आणखी आतां सांगतेस ?

**सुधा**—काय म्हणजे ? इथं आल्यापासून कीं नाहीं, एकान्त कसला तो नांवालासुद्धां मिळत नाहीं !

**सुरेश**—अग कसला घेऊन बसली आहेस एकान्त ? सगळीच आकान्त व्हायची पाळी आलीय आतां.

**सुधा**—इश्श ! अशोक आणि सरल पहा बरं ! कशी अगदीं प्रेमाच्या गुलगुल कानगोष्टी बोलत असतात.

**सुरेश**—म्हणजे ? इथपर्यंत आली का पाळी ?

**सुधा**—म्हणून म्हणतें आपणहि तशीच बोलत बसूं गडे. अशोक–सरलला कसं प्रेमाच्या कानगोष्टी बोलण्यापलीकडे दुसरं कांहीं सुचतच नाहीं.

**सुरेश**—अरे अरे अरे ! धिक्कार–धिक्कार असो त्याच्या पुरुषत्वाला !

**सुधा**—हें काय भलतंच ?

**सुरेश**—अग वेडे, खरीं प्रेमी जोडपीं प्रेमाच्या गोष्टी बोलत नसतात. मी नुसता प्रेमाच्या गोष्टी बोलणारा प्रेमवेडा नसून प्रेमाच्या गोष्टी करणारा प्रेमवीर आहें. समजलीस ? अग जे प्रेमाच्या गोष्टी नुसत्या बोलतात, त्यांच्या हातून काय होणार ? म्हणच आहे, बोलेल तो करील काय नि गर्जेल तें पडेल काय ? अग, तारुण्यानें मुसमुसलेली तरुणी जवळ असतांना जो प्रेमाच्या गोष्टी बोलण्यांतच अमोल वेळ वांया घालवतो, त्या शुकमुनीच्या कार्बन कॉपीला माझा नमस्कार असो !

**सुधा**—जाऊं द्या तें ! पण खरं सांगायचं गडे ! सरलला बनावट बायको केलीत, म्हणून मला सोडून तिलाच नाहीं ना खरी बायको करणार ?

**सुरेश**—सरल ? आणि बायको ? हड् ! अग तुझ्यासारख्या अप्सरेला सोडून, त्या पांढऱ्या पालीशीं कोण करील लग्न ? तूं ती तूं, आणि सरल ती सरल ! हें पहा, बायका असल्याशिवाय कीर्तनाला गर्दी जमत नाहीं, आणि गर्दी असल्याशिवाय कीर्तनाला रंग येत नाहीं; तेंच कशाला ? ऑडिअन्स असल्याशिवाय जसं नाटक रंगत नाहीं, तसं तूं असल्याशिवाय माझ्या जीवनाला रंग चढत नाहीं ! सुधा, तूं अप्सरा आहेस !

पद

नाजुक साजुक तूं नवबाला, प्रेमला ॥
जीव माझा प्रितीला सखे भुलला ॥ ध्रु० ॥
सहज गुंगवी या हृदयाला ॥
हांसरा हा चंचल चाळा ॥
तुझाचि जडला छंद मनाला ॥ १ ॥

**सुधा**—खरंच का हो मी अप्सरेसारखी आहें ? कीं उगीच ?

**सुरेश**—अप्सरेसारखी ? छट् ! अप्सरेहून सुंदर !

**सुधा**—तुमचं आपलं कांहीं तरीच !

**सुरेश** — कांहीं तरीच नाहीं; अगदीं खरं ! तूं अप्सरा पाहिली आहेस का कधीं ? (ती नकारार्थी मान हालवते) बरं, अद्याप कोणी पाहिल्या आहेत का अप्सरा ?

**सुधा** — कशा दिसतील त्या अप्सरा कुणाला ? कांहीं तरीच आपलं तुमचं ! अप्सरा म्हणे असतात स्वर्गात ? आणि मेल्याशिवाय कांहीं स्वर्ग दिसत नाहीं. मग स्वर्गातल्या अप्सरा कशा दिसतील कुणाला ?

**सुरेश** — खोटी गोष्ट आहे.– निव्वळ थाप आहे ही ? अप्सरा स्वर्गात असतात अशी अफवा उठविण्यासाठीं, कोणी तरी थाप मारलेली आहे ही ! अप्सरा स्वर्गात नसतात.

**सुधा** — अप्सरा स्वर्गात नसतात, हें तुम्हांला तरी काय हो माहीत ?

**सुरेश** — वाः ! काय माहीत म्हणजे ? मागच्या जन्मीं मरून मी स्वर्गात गेलों होतों ना ? तेव्हां अप्सरा पहाण्यासाठीं स्वर्गाच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत टॅक्सीनें सारख्या चकरा मारल्या, पण अप्सरा असेल तर शपथ ! अप्सरांच्या शोधासाठीं, अग मी स्वर्गातला सुखलाजी स्ट्रीट, कामाठीपुरा, फोरास रोड, इतकच काय पण स्वर्गातली दाणेआळीसुद्धां पालथी घातली, पण कुठेंहि अप्सरा आढळली नाहीं.

**सुधा** — मग असतात तरी कुठं त्या ?

**सुरेश** — ह्या जगांत !

**सुधा** — ह्या जगांत ? मग दिसत नाहीत कशा ?

**सुरेश** — त्याचं कारण असं आहे कीं, लेखकांना जसं वाङ्मयचौर्य करायची सवय असते, तशी बायकांना सौंदर्यचौर्य करायची संवय असते. त्याच संवयीला अनुसरून अप्सरांनीं तुझ्या सौंदर्याची चोरी केली, आणि तेव्हांपासून तुझ्याच काय, पण कुणाच्याही दृष्टीस पडायची त्यांना चोरीच झाली आहे. समजलं ? अग अप्सराच काय, पण प्रत्यक्ष नक्षत्रापेक्षांहि सुंदर आहेस तूं.

**सुधा** — खरं कीं काय ?

**सुरेश** — तर काय खोटं वाटतं ? तुझ्या दैदीप्यमान् सौंदर्याच्या लखलखाटानं नक्षत्रांचे डोळे दिपून जातात, नि तीं किलकिल्या डोळ्यांनीं तुझं नितांत रम्य सौंदर्य पहाण्याची पराकाष्ठा करतात. परंतु अधु नजरेच्या कांहीं नक्षत्रांना तुझ्या सौंदर्याचें प्रखर तेज सहन न झाल्यामुळें त्यांना घेरी येते नि आकाशांतून त्यांचा तोल जातो. मूर्ख लोक त्यांना उल्का म्हणतात !

**सुधा** — पण तें नक्षत्र तोल जाऊन मग पडतं कुठं ?

**सुरेश** — कुठं म्हणजे ? तुझ्या पायांवर !

**सुधा** — माझ्या पायांवर नक्षत्र पडलं आहे म्हणतां ! इतकी का हो मी नाचरी आहे ?

**सुरेश** — छे छे ! तसं कुठं म्हटलं मीं ? अग तुझ्या पायांवर नक्षत्र पडतं म्हणजे तुझ्या पायांवर तें नक्षत्र लोटांगण घेतं ! समजलं ?

**सुधा** — पहायचं, वेली वृक्षांना बिलगून, फुलांच्या रूपानं कशा हंसताहेत त्या !

पद

**सुधा :— प्रीतीचें नंदनवन फुललें ।**
**सुरेश :— हांसत नाचत दुनिया खेळे ।**
**सुधा :— नाजुक मैना मंजुळ बोले ।**
**सुरेश :— बुलबुल भोळा हलुहलु डोले ।**
**गालीं तुझ्या कां गुलाब फुलले ।**
**सुधा :— यौवन सखया हें रसरसलें ।**
**सुरेश :— मोहरलें हें जीवन सगळें ।**
**दोघे :— हांसत नाचत दुनिया खेळे ।**
**प्रितीचें नंदनवन फुललें ॥ १ ॥**

[ मागच्या बाजूनें अण्णा वेड्यांच्या हॉस्पिटलांतून परत येऊन त्यांच्या मागे उभे राहतात.

**अण्णा** — सुरेश ! ( दोघेंही एकदम दचकून उभीं राहातात. ) छान - छान चाललं आहे वैवाहिक जीवन ! कारट्या, तूं मांडलं आहेस तरी काय ? तूं वेड लावणार मला आतां ! आणि काय ग ये सटवे, लाज नाहीं वाटत मैत्रिणीच्या नवऱ्याशीं असे नाच रंग करायला ? अरे पोरा, तूं असा कां वागतोस तें सांग तरी सरळ ! तुझी बायको ती सरल - थांब तिलाहि बोलावतों. सरल - ये सरल ! आधीं इकडे ये ! - तीं तर त्या वेड्याचाच हात धरून फिरते. तूं हिलाच घेऊन बसतोस सारखा. ( सरल येते. ) अग सरल, हें आहे तरी काय ? हा अद्यापीहि आहेच हिच्या नादांत. तूं त्या दारुड्याच्या लग सोडत नाहींस. तो वेडा मलाच वेडा म्हणतो. काय आहे काय हें ?

**सुरेश** — खरं सांगूं का अण्णा, मला तर वाटतं, कांहीं घोटाळा झाला आहे.

**अण्णा** — तुलासुद्धां वाटतं ना घोटाळा झाल्यासारखं ?

**सुरेश** — वाटतं म्हणजे काय ? झालाच आहे घोटाळा !
**अण्णा** — सरल, सुधा, तुम्हांला ?
**सरल** — घोटाळा म्हणजे काय ? चांगलाच ब्रह्मघोटाळा झालाय कांहीं तरी !
**अण्णा** — पण कसा व्हावा घोटाळा ?
**सुरेश** — मला वाटतं, शिवाच्या धांदरटपणामुळं कांहीं तरी झालेलं असावं.
**अण्णा** — शिवाच्या ? पण तो तसा कांहीं धांदरट नाहीं.
**सुधा** — वाः ! नाहीं कसा ? तो तर पक्का धांदरट आहे. माझी काय गंमत केली त्यानं ती विचारा ! ( सुरेशकडे हात दाखवते. )
**सुरेश** — हो ! अण्णा, तुम्हीं हिला पेपर दे आणून वाचायला म्हणून सांगितलं होतं ना ? तेव्हां त्यानं हिला फेपरं आलंय असं समजून डाव्या पायांतला जोडाच आणला ( सर्व हंसतात. सर्वांपेक्षां अण्णा जास्त हंसतात. )
**अण्णा** — असं का ? असतात कांहीं माणसं धांदरट तशीं ! अरे हा तर बोलून चालून गडी; पण चांगलीं चांगलीं माणसंसुद्धां कधीं कधीं असाच धांदरटपणा करतात. बसा – मी एक गोष्ट सांगतों त्यासबंधानं तुम्हांला. ( सर्व बसतात. ) आमच्या तरुणपणाची गोष्ट आहे ही. माझे एक स्नेही होते डॉक्टर. आमची बैठक त्यांच्याच दवाखान्यांत असायची कायम ! एकदां काय झालं ? एका रोग्याला त्यांनीं सांगितला एनिमा घ्यायला. एनिमा त्या वेळीं नवीनच निघाला होता बरं का ? फारशा लोकांना एनिमा म्हणजे काय, हेंसुद्धां माहीत नव्हतं. तेव्हां त्या रोग्यानं डॉक्टरला काय विचारावं ? सांग – पाहूं बरं तुझं डोकं ?
**सुरेश** — आपल्याला नाहीं बुवा कांहीं कळत !
**अण्णा** — ( वेडावून ) आपल्याला नाहीं बुवा कांहीं कळत ! परमेश्वरानें तुला ( पायांकडे बोट दाखवीत ) हे दोन डोके दिले आहेत. डोकें कांहीं दिलें नाहीं. ( सुधा, सरल व अशोक हंसतात. )
**सुधा** — काय विचारलं अण्णा त्या रोग्यानं ?
**अण्णा** — एनिमा म्हणजे एखादें औषध असेल, असं समजून त्यानं विचारलं, डॉक्टर मी एनिमा घेतों; पण तो कशांतून घेऊं ? दुधांतून कीं मधांतून ? [ सर्व हंसतात ] हंसतां हंसतां पुरेवाट झाली आम्हांला ! तेव्हां काय ? बहुतेक शिवानंच कांहीं तरी घोटाळा केलेला असावा. तो म्हणजे असा आहे कीं ज्याचं नांव तें ! त्या ठोंब्याला हांकलूनच लावतो आतां.

[ तोंच शिवा व साळू डोकीवर बोचकीं घेऊन जाण्याच्या तयारीनें येतात.

**अण्णा** — कायरे ये शिव्या, हें काय चालवलं आहेस तूं ?

**शिवा** — मी चाल्लांव शेट !

**अण्णा** — कुठं चाललास ?

**शिवा** — बाणकोटास !

**सुरेश** — अरे पण असा एकाएकीं कां चाललास ?

**अण्णा** — घांदरट आहे झालं ! अरे काय झालं तुझं ? कां नोकरी सोडून चाललास ?

**शिवा** — नोकरी ? साला हाय काय नि नाय काय ? बायको सलामत तर नोकरी पचास !

**सुरेश** — अरे स्पष्ट सांग काय तें. काय झालं ?

**शिवा** — ( रागानें ) काय झालं ! ( अण्णांना ) शेट, ह्या धाकट्या शेटचा डोला हाय माज्या मागारनीवर !

**सुरेश** — तुझंहि डोकं फिरलं कीं काय ?

**शिवा** — माजं नाय डोकं फिरलं ! मघां तुमी काय म्हनाला ऑ ? काय म्हनाला ?

**अण्णा** — काय म्हणाला हा शिवा ? ( सुरेशला ) तूं म्हणजे असा आहेस, अगदी ज्याचं नांव तें !

**सुरेश** — अहो अण्णा मीं खरोखरच कांहीं नाहीं म्हटलं !

**शिवा** — साला हाय काय नि नाय काय ? काय नाय म्हतलं ? शेट, हे म्हनाले, गड्याची बायको मिलाली असती, तर काय मौज झाली असती ! साला हाय काय नि नाय काय !

**सुरेश** — गड्याची बायको ? कधीं म्हटलं मीं तसं ?

**शिवा** — मघां. खुर्ची–टेबलाच्या गोष्टी सांगतांना !

**सरल** — खुर्ची — टेबलाच्या गोष्टी कसल्या ?

**सुरेश** — ( आठवण करून ) हां हां ! बरोबर ! मीं काय म्हटलं गमतीनं, घडीची खुर्ची मिळते, घडीचं टेबल मिळतं, तशी घडीची बायको मिळाली असती तर काय मौज झाली असती ! घडीची बायको ऐकण्याऐवजीं ‘ गड्याची बायको ’ असं ऐकलं यानं. ( सर्व खो खो हंसतात )

**अण्णा** — घांदरट रे घांदरट ! तुझ्या घांदरटपणाचा इतका कळस झाला कीं अगदीं ज्याचं नांव तें ! चल आधीं, जा तीं बोचकीं ठेव नि कामाला लाग आपल्या. [ साळू आंत जाते. ]

शिवा — आणि शेट, हें बगा कुनाचं पत्र मिळालं तिथं. ( शिवा अशोकचं ाळेलं पत्र अण्णाकडे देतो. )

अण्णा — ( तें पत्र वाचून ) अरेच्या ! मग अजून कसें आले नाहींत अशोक ! ड्याचं हॉस्पिटल पहायला येणार होते हे कादंबरीकार ! ( सुरेश, सुधा, सरल कमेकांकडे चमत्कारिक नजरेनें पहातात. इतक्यांत मागून अशोक येतो. ) ाला का हा वेडा पुन्हां !

अशोक — मी वेडा नाहीं, ( सरलकडे बोट दाखवून ) हिचा प्रियकर आहे.

अण्णा — ( उठून ) भलतंच बोलशील, तर थोबाड फोडून टाकीन. वेडा- वेडा कांहीं म्हणणार नाहीं. म्हणे हिचा प्रियकर ! वेड्या, ही माझी सून, हा ाझा मुलगा. आणि म्हणे मी हिचा प्रियकर ! शरम नाहीं वाटत !

सुरेश — अण्णा, क्षमा करा ! हे हिचे प्रियकरच आहेत.

अण्णा — ऑं ! म्हणजे ? हे कोण ?

सुरेश — हेच ते अशोक कादंबरीकार !

अण्णा — म्हणजे म्हणतोस काय तूं ? आणि ही ?

सुरेश — माझी भावी बायको ! ' मी तुझ्याशींच लग्न करीन ' असं मीं हिला ाचन दिलं होतं, म्हणून हिच्यासाठीं आणि तुमच्या अटीसाठीं मीं सरलला ाझी बनावट बायको केली होती.

अण्णा — हं — बनावट बायको करून मलाच बनवूं पहात होतास काय ! अरे पण ुला सुधेशीं लग्न करायचं होतं, तर अगोदरच तसं का नाहीं सांगितलंस !

सुरेश — तुम्हीं रागावलां असतां म्हणून !

अण्णा — अरे त्यांत माझा राग नि बीग कसला ? मियाबिबी राजी तो क्या करेगा काजी ! काय हो कादंबरीकार ?

अशोक — अहो अण्णासाहेब, तुमच्या ह्या चिरंजिवांनीं मला वेड्यांत काढून ाबंध दिवस हाल केले माझे. शेवटीं मींसुद्धां बरोबर इंगा दाखवला यांना. माझ्या बायकोला यांनीं आपली बनावट बायको केली, यांच्या बायकोला मीं माझी बनावट बायको बनवली !

सुरेश — अण्णा, तुम्हाला अशा रीतीनें फसविल्याबद्दल क्षमा करा मला.

**अण्णा**—तूं म्हणजे असा आहेस, कीं ज्याचं नांव तें! अरे त्यांत क्षमा कसली मागतोस? अरे हें कांहींच नाहीं. माझ्या लग्नाच्या वेळीं मी माझ्या वडिलांना असं हातोहात फसवलं होते म्हणतोस, कीं ज्याचं नांव तें! अरे हें कसलं फसवणं! फसवावं आम्हीं जुन्या माणसांनींच! आतां तीं माणसंहि नाहींत नि तीं फसवणींहि नाहींत. गेला तो काळ! हं—तेव्हां काय? मृत्युपत्र बदललं पाहिजे. असो. अशोक, तुमची मात्र मघाच्यामध्यें उगीच कुचंबणा झाली. आतां उद्यां नेईन मी वेड्यांच्या हॉस्पिटलांत तुम्हांला!

**अशोक**—कांहीं नको आणखी वेड्यांचं हॉस्पिटल बघायला. आज सबंध दिवस वेड्यांचे चाळे पाहून वेड लागायची वेळ आली होती!

**अण्णा**—(सरलला) मग काय तूं अशोकशीं लग्न करणार तर? छान. चांगला काढलास नवरा शोधून. कादंबऱ्या वाचायला मिळतील आयत्या! तूं म्हणजे अशी आहेस, अगदीं ज्याचं नांव तें! आणि अहो आमच्या खऱ्या सुनबाई, कांहीं बोललों चाललों असेन तर राग मानूं नका बरं! मी म्हणजे असा आहें, अगदीं ज्याचं नांव तें!

**सुरेश**—पण अशोक, तुम्हांला वेड्यांच्या जीवनावर कादंबरी लिहायची आहे ना!

**अशोक**—तो बेत रद्द करून, आतां ह्या कथानकावर आधीं एक नाटक लिहिणार!

**सुधा**—नांव काय देणार त्याला?

**अशोक**—बनावट बायको!

**अण्णा**—वा:! फक्कड नांव काढलंत शोधून! बनावट बायको! नांव इतकं सुंदर आहे कीं अगदीं ज्याचं नांव तें!

